


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष ३६, अंक १, हिवाळा २०१८



## राम गणेश गडकरी

(गोविंदाग्रज, बाळकराम)

२६ मे १८८५ - २३ जानेवारी १९१९

विद्वत्प्रमाणित त्रैमासिक (Referred Journal)

RNI No. 40048/83 ISSN - 2231-4059
Marathi Abhyas Parishad Patrika

अनुक्रमणिका









महाराष्ट्र शासनाच्या राज्य मराठी विकास संस्थेच्या वतीने दरवर्षी सुप्रसिद्ध भाषावैज्ञानिक डॉ. अशोक केळकर यांच्या स्मरणार्थ मराठी- भाषा- अभ्यासक- पुरस्कार दिला जातो. २०१७ चा हा पुरस्कार डॉ. अविनाश बिनीवाले यांना दि. २७ फेब्रुवारी, १८ या मराठी भाषा गौरव दिनी उत्तर प्रदेशचे राज्यपाल श्री. राम नाईक आणि सुप्रसिद्ध लेखिका अरुणा ढेरे यांच्या हस्ते सन्मानपूर्वक प्रदान करण्यात आला. याप्रसंगी श्री. व सौ. बिनीवाले, मराठी भाषा मंत्री श्री. विनोद तावडे, मराठी भाषा विभागाचे प्रधान सचिव श्री. भूषण गगराणी, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश मंडळाचे अध्यक्ष श्री. दिलीप करंबेळकर, भाषा सल्लागार समितीचे अध्यक्ष श्री. सदानंद मोरे, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष श्री. बाबा भांड, श्री. श्याम जोशी इत्यादी मान्यवर उपस्थित होते.



**मराठी अभ्यास परिषद पत्रिका भाषा आणि जीवन**
वर्ष ३६, अंक १, हिवाळी २०१८, जानेवारी-मार्च २०१८

**अनुक्रमणिका**



**विशेष निवेदन**

गेली दोन वर्षे टपालपत्ता बदलल्यामुळे आणि काही व्यवस्थापकीय अडचणींमुळे, मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन' चे अंक नियमितपणे निघू शकले नाहीत. याबद्दल क्षमस्व!

आगामी काळात आम्ही हे सारे अंक (कदाचित नेहमीपेक्षा कमी पानांचे) लागोपाठ प्रकाशित करण्याचा प्रयत्न करत आहोत. समृद्ध परंपरा असणाऱ्या आपल्या नियतकालिकाच्या नियमिततेत खंड पडणे योग्य नाही, याची आम्हाला जाणीव आहे. २०१९ ह्या वर्षाच्या अखेरपर्यंत नियमानुसार सर्व अंक प्रकाशित होतील, असे प्रयत्न आम्ही करत आहोत. 'भाषा आणि जीवन'वरील आपला लोभ कायम ठेवावा, ही सर्व वाचक, अभ्यासक आणि वर्गणीदार यांना विनंती.

कार्यकारी मंडळ, मराठी अभ्यास परिषद

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका भाषा आणि जीवन**

**विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक**

**RNI 40048 ISSN : 2231-4059**

वर्ष ३६, अंक १, हिवाळा (जानेवारी-मार्च), २०१८

**त्रैमासिक :** जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी)

**संपादक :** प्र. ना. परांजपे

**संपादन समिती :** आनन्द काटीकर, विजय पाध्ये, विजया चौधरी, सलील वाघ

**प्रकाशक, मुद्रक, संपादकीय व व्यवस्थापकीय पत्रव्यवहार आणि वर्गणी पाठवण्यासाठी पत्ता -**

आनन्द काटीकर, बी-५/१६, सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे -४११०५१

**संपर्क :** ९४२१६ १०७०४

**ई-पत्ता :** marathi.abhyas.parishad@gmail.com

**मुद्रणस्थळ :** विनायक एन्टरप्रायझेस, ५१७ कसबा पेठ, पुणे ४११०११

**वर्गणीचे दर**

| | व्यक्ती | संस्था |
|---|---|---|
| वार्षिक | १५० | २०० |
| त्रैवार्षिक | ४०० | ५५० |
| पंचवार्षिक | ७०० | ९०० |
| आजीव | २,१००/- | नाही |

सुट्या अंकाची किंमत - रु. ४०/-

**- थेट बँकेत वर्गणी भरण्याची सूचना -**

खातेधारक नाव : मराठी अभ्यास परिषद

खाते क्रमांक : २००५ ७१६ ४२६०

बँकेचे नाव : बँक ऑफ महाराष्ट्र

शाखा : टिळक रस्ता, पुणे

**IFSC : MAHB000041**

**सूचना :** १) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या कोणत्याही लेखाशी, लेखकाच्या मतांशी संपादक किंवा मराठी अभ्यास परिषद सहमत असेलच, असे नाही.

२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे. तथापि या अंकात प्रसिद्ध झालेल्या कोणत्याही लेखाशी, लेखकाच्या मतांशी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ आणि महारष्ट्र शासन सहमत असेलच, असे नाही.

३) मराठी अभ्यास परिषद पत्रिका भाषा आणि जीवन हे विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक आहे. येथे प्रसिद्ध होणारा कोणताही लेख त्या त्या विषयातील तज्ज्ञांच्या अभिप्रायानंतरच प्रकाशित केला जातो. त्यामुळे लेखकांनी लेख पाठवताना प्रकाशनासाठी लागणारा काळ लक्षात घ्यावा, ही विनंती.

# सावध ऐका पुढल्या हाका!

आनन्द काटीकर

भाषा हा मानवाला जन्मजात लाभलेला साज. त्या आधारे मानवाच्या संस्कृतीची जडणघडण होत गेली हे निर्विवाद! मात्र **अतिपरिचयात अवज्ञा** या सुभाषितानुसार आपण त्याच्या एकंदरीत स्वरूपाकडे दुर्लक्षच करतो आहोत. आणि त्या अलंकाराचा केवळ व्यावहारिक लाभ लक्षात घेतो आहोत. परिणामी भाषेच्या आधारे होणारे संज्ञापन दिवसेंदिवस त्याच-त्याच शब्दांचे, त्याच पद्धतीचे, नवीन मळवाट न शोधता जुन्या चाकोरीतूनच पुढे जाणारे होऊ लागले आहे.

याची कारणे काय असावीत याचा शोध घेताना लक्षात येते ती समाजातील सुरक्षित, कूपमंडूक आणि थोडीशी आत्ममग्नतेकडे झुकणारी प्रवृत्ती. विद्यार्थ्याला ज्या विषयात खरोखरच रस आहे, त्या विषयात भवितव्य घडवण्याची संधी पालक देत नाहीत, अशी उदाहरणे आजूबाजूला दिसतात. याचे कारण नवीन प्रयोग करण्याची वाटू लागलेली भीती. आपल्या आयुष्यात छोट्याछोट्या गोष्टींत असे प्रयोग करून बघण्याकडे किती जणांचा कल असतो? माझी नेहमीची गाडी वापरण्याची सवय बंद करून मी बस-दिन वगळता कधीतरी सार्वजनिक वाहनाने जाऊ शकतो? किमान तसा विचार तरी करतो? आपल्या मुलांना सगळे चांगले तेच द्यायच्या नादात त्यांना आपण समाजातील विविध अनुभवांपासून वंचित तर ठेवत नाही ना? समाजातल्या सर्व स्तरांत आपला आणि आपल्या पाल्याचा वावर व्हायला हवा, असे आपल्याला वाटते? भाजी आणणे, दळण आणणे, कपडे इस्त्रीला टाकणे किंवा घरात स्वतः इस्त्री करणे इत्यादी गोष्टी आपण पाल्याकडून करून घेतो? घरकामाला असणारी बाई आली नाही तर ती कामे आपण करायला हवीत, याची आपली मानसिकता तरी असते? कदाचित या संपादकीयामध्ये विषयांतर तर होत नाही ना! असा प्रश्न आपल्या मनात येणे स्वाभाविक आहे. मात्र समाजातल्या सर्व स्तरांतले जितके वेगवेगळे अनुभव आपण घेऊ, तितकी आपली भाषा समृद्ध होत जाते. नवनव्या अर्थच्छटा कळतात. वाक्प्रचार-म्हणी यांचा वापर करून कमीतकमी शब्दांत संप्रेषण कसे घडवता येते, याचा अंदाज येतो.

श्रवण आणि भाषण ही कौशल्ये प्रत्येक निरोगी माणसाला जन्मजात लाभतात. पण श्रवणाच्या सर्व स्तरांमध्ये आणि पातळ्यांमध्ये संचार केला तरच भाषण हे कौशल्य विकसित होते, हे आपण विसरत चाललो आहोत. आजच्या शालेय आणि महाविद्यालयीन शहरी विद्यार्थ्यांच्या भाषेत आपोआपच हिंदी किंवा इंग्रजी शब्दांची भरताड होते आहे पण त्यामुळे मराठीतील विविध बोलींतील शब्दांपासून ते दुरावले जात आहेत, याकडे लक्ष देणे गरजेचे आहे. हे सारे भाषासंचित आहे. आपल्याला आपल्या पूर्वजांपासून ते लाभलेले आहे. ते अत्यावश्यक नसले तरी भविष्यातील सामाजिक व्यवहारात त्याचा उपयोग नक्कीच आहे.



अनुक्रमणिका

ज्या पिढीने आज सामाजिक-सांस्कृतिक व्यवहारात काही दखल घेण्याजोगे काम केले आहे, ती पिढी स्वतःला मिटून घेते आहे की काय? अशी शंका येते. मराठी समाजातल्या सर्वच सामाजिक-सांस्कृतिक व्यवहाराची तपासणी केली तर नाट्य आणि संगीतक्षेत्र वगळता अन्य क्षेत्रांत वावरणाऱ्या मंडळींच्या वयाचा ल.सा.वि. ४५च्या वरच असेल. अशा परिस्थितीत नवीन पिढी घडलीच नाही तर भाषिक व्यवहारावर त्याचा मोठा परिणाम होऊ शकतो. भाषा कुंठीत झाली तर ज्ञानव्यवहारावर संक्रांत येऊ शकते. जुन्या पिढीने वानप्रस्थ स्वीकारून नवीन पिढीच्या हातात प्रत्यक्ष काम करण्याची सुविधा उपलब्ध करून देणे, नवीन पिढीच्या चुकांवर पांघरूण न घालता, झाल्या चुका दुरुस्त करून त्यांना प्रेमाने समजावून सांगण्याची तयारी ठेवणे, नवीन पिढीला जुन्या संचितापासून अलग न करता त्या संचिताचे आणि त्याचे जवळचे नाते आहे, त्या आधारे पुढच्या पिढीला अधिक नवे अवकाश खुले होते आहे, याचे भान आणून देणे आवश्यक आहे.

ज्या पिढीने औपचारिक तर सोडाच पण अनौपचारिक लेखनव्यवहारही फारसा पाहिला नाही, ज्या पिढीसमोर 'एक ना धड.....' असा भाषिक पेच आहे, ज्या पिढीला भाषेचा अभ्यास म्हणजे केवळ साहित्याचा अभ्यास आणि त्यातही तो केवळ सामाजिक अंगानेच करायचा असतो, असे वाटते, अशा पिढीतून भाषा-अभ्यासक घडवण्याचे मोठे आव्हान आज समोर उभे ठाकले आहे. या नवीन पिढीला जर बरे-वाईट, लहान-मोठे भाषिक अनुभवच घेता आले नाहीत तर त्यापुढची पिढी तर कर्तृत्वाच्या पातळीवर अधिक खुरटी होण्याचा संभव आहे.

आज डेक्कन महाविद्यालय आणि राज्य मराठी विकास संस्थेच्या सहयोगातून सुरु असणाऱ्या मराठीच्या बोलींचे प्रतिमांकन या प्रकल्पात ताज्या दमाचे १२ अभ्यासक तयार होत आहेत. या प्रकल्पात अजून ८-१० जण सहभागी होतील. अमराठी भाषकांना मराठी शिकवण्यासाठी १०-१२ जण प्रशिक्षित झाले आहेत, त्यांना विविध ठिकाणी अध्यापनाचा अनुभवही मिळतो आहे. पुस्तकांचं गाव साकारणारे सारेच हात तरुण आहेत. मराठी लेखनशोधक तयार करण्यासाठी तांत्रिक बाजू समर्थ असणारे तरुण लाभले आहेत. भविष्यातील भाषेच्या अभ्यासकांची ही नांदी आहे. या नांदीने सुरु होणारी ही भाषायात्रा नियमितपणे फुलत-फळत राहावी, याचे प्रयत्न सर्वांनी मिळून करायला हवेत.

त्यामुळेच आज उत्तम भाषिक समज असणाऱ्या पिढीने नवीन पिढी घडवण्यासाठी अधिक वेळ खर्च करावा, त्यांना मुळापासून एखादी गोष्ट शिकवण्याची तयारी ठेवावी, त्यांच्या योगक्षेमाचा विचार करून योजना आखाव्या. भाषा आणि जीवनव्यवहार यातले नाते अधिक भक्कम होण्यासाठी ही पायाभरणी करणे ही काळाची गरज आहे. आपल्या भाषेची हीच खरी सेवा आहे. या हाका सावधपणे ऐकल्या नाहीत तर मात्र काळ आपल्याला क्षमा करणार नाही.





अनुक्रमणिका

## हरवलेल्या भाषा-भगिनींचा शोध

भाऊ तोरसेकर

सोशल मीडिया ही मोठी गंमतीशीर बाब आहे. जगाच्या एका टोकाला बसलेला माणूस शेजाऱ्याशी बोलावे, तसा यातून एकमेकांच्या संपर्कात येत असतो. सौदी अरेबियाच्या तेल उद्योगात नोकरी करणारा सिमसन त्यामुळे संपर्कात आला. त्याने आपल्या फेसबुकवर एका मराठी बोलीभाषेतील कुठलीशी म्हण वापरली होती आणि तिचा उच्चारही मला गमतीशीर वाटला. म्हणून मी त्याला त्याच म्हणी व तत्सम उक्तींचा उहापोह नित्यनेमाने करायचा आग्रह धरला. त्यानेही उत्साहात प्रतिसाद दिला. त्यातून लक्षात आले, की वसई-विरारच्या काही भागात ही कादोडी नावाची बोली चालते. सिमसन लिहू लागला आणि त्याच्या फेसबुकवर अनेकजण त्याच बोलीत व्यक्त होऊ लागले. काहीजण त्या भाषेचा अभ्यास करणारे, ती बोली ओळखणारे, तर काहीजण त्याविषयी आस्था बाळगणारे होते. त्यापेक्षाही चकित करणारी बाब होती, खुद्द सिमसन! मायभूमीपासून हजारो मैल दूर सौदी अरेबियाच्या वाळवंटात तेलखाणींमध्ये देखभालीत गुंतलेला हा माणूस, तिथे बसून आपल्या माय'बोली'विषयी कमालीचा हळवा आहे. जागतिकीकरण व आर्थिक कारणास्तव वेगाने होणाऱ्या स्थलांतरामुळे जगाच्या कानाकोपऱ्यातील लहानसहान संस्कृती व बोलीभाषांवर गंडांतर आलेले आहे. इथे मराठी शाळा बंद होत असल्याची चिंता अनेकांना भेडसावते आहे, तर कर्नाटकात सार्वजनिक जागी हिंदी व देवनागरी लिपीतल्या फलक व जाहिरातींविरुद्ध तिथल्या संस्था संघटना रस्त्यावर उतरल्या होत्या. अशा व्यापक संदर्भाने मला सिमसनच्या मायबोली जिव्हाळ्याने आकर्षित केले. भारतात काही काळासाठी परतलेल्या सिमसनने घरी बोलावले आणि तिथे एक मोठा गोतावळा भेटला. एकाहून एक कादोडी बोलीचे पुरस्कर्ते व हितचिंतक भेटले आणि त्यांचा आग्रह आपल्या बोलीला असण्यापेक्षाही, जगातून अस्तंगत होत चाललेल्या प्रत्येक बोली व संस्कृतीसाठी होता. मातीशी नाळ अशी जोडलेली असते.

नंदाखाल या वसईतील सिमसनच्या गावात व घरात पोहोचलो आणि त्याचे कुटुंबीय भेटले. गप्पा खूप झाल्या. आगतस्वागतही झाले. पण सगळी चर्चा कादोडी बोली व कुपारी संस्कृतीविषयी होती. त्या चर्चेतून एक लक्षात आले, की ही भाषा सामवेदी समाजघटकाची आहे आणि त्यात अनेकजण धर्माने ख्रिश्चन आहेत. पण सिमसन व त्याच्या गोतावळ्यातील प्रत्येकाला आपल्या संस्कृती व बोलीची फिकीर का पडलेली आहे? तीनचार पिढ्या मागे आसपासचा सगळा परिसरच कादोडीत बोलत होता आणि जगत होता. आता प्रत्येक पिढीमागे ती आपल्याच घरातली मुले शिक्षण व कामानिमित्त अन्यत्र गेल्यावर कादोडी बोलीशी तुटत गेली, तर

या बोलीचे भविष्य काय? दूर सौदी अरेबियाच्या वाळवंटात घाम गाळताना सिमसनला अशी चिंता सतावते, याचे अप्रूप वाटले. त्यापेक्षाही तिथे जमलेल्या गोतावळ्याला ही बोली टिकवावी कशी व बोलती राहावी कशी, याचे उपाय शोधायचे होते. तशीच चर्चा चालली होती. मराठी भाषा संवर्धन वा तिला अभिजात बनवायच्या गप्पा अधूनमधून आपण ऐकत असतो. त्यासठी शासनाकडून होणाऱ्या प्रयत्नांच्या बातम्याही आपल्या कानी येत असतात. त्यात इतके कोटी रुपये दिले वा अमूकतमूक समित्या नेमल्याचे आपल्याला ऐकून ठाऊक असते. पण ज्या भाषेला शेकडो लहानमोठ्या बोली समृद्ध करीत असतात, त्याच कुठल्याही अभिजात भाषेची पाळेमुळे असतात. ती पाळेमुळे छाटली जाणार असतील, तर मराठीचा वटवृक्ष डौलदार डेरेदार तरी कसा व्हायचा? चारदहा लोकांनी त्याचा अभ्यास केला, प्रबंध लिहिले वा त्यावर संशोधन करून त्यांच्या इतिहास भूगोल नोंदवून ठेवला; म्हणजे त्या बोली आणि पर्यायाने मराठी समृद्ध होईल का? वस्तुसंग्रहालयात जतन केलेल्या संस्कृती वा वस्तू त्या परंपरांचे संगोपन करीत नसतात.

सिमसनचे मामा पन्नास वर्षे डायरी लिहीत आहेत आणि त्यांनी या कुपारी संस्कृती व कादोडी भाषेवर पुस्तकही लिहिलेले आहे. इतक्या शेकड्यांनी नोंदी असलेल्या त्या पुस्तकाची पाने कमी करावीत म्हणून प्रकाशक त्यांना आग्रह धरतो आणि कारण काय असेल? इतके लांब मोठे कोण वाचणार आहे? यापेक्षा कुठल्याही भाषा संस्कृतीचे दुर्दैव असू शकत नाही. तळकोकणातल्या बोलीला मालवणी म्हणतात, पण तिच्यातही आठदहा पाठभेद आहेत. पण मच्छिंद्र कांबळीच्या विविध मालवणी नाटकांनी त्या बोलीभाषेला कोकणातून जगाच्या नकाशावर आणून ठेवलेले आहे. मुंबईत राबायला आलेला चाकरमानी म्हणून ज्या मालवणी माणसाकडे तुच्छतेने बघितले जायचे, त्याच्या खाद्यपदार्थाची आज मुंबईसह मोठ्या महानगरात हॉटेले झालेली आहेत. सिमसन मला रात्री उशिरा माघारी घरी सोडायला आला, तेव्हा अहमदाबाद हायवेवर एका ढाबासदृश हॉटेलात चहा घ्यायला थांबलो. बाहेर पडताना लक्ष गेले, तर तिथल्या फलकावरही स्पेशालिटी म्हणून मालवणी फूड अशी जाहिरात होती. मी मालवणी असल्याने सुखावलो, तरी वसईच्या हायवेवर कुपारी खाद्यपदार्थाचा फलक का दिसू नये, याचे वैषम्य वाटले. जगातला भारत हा सर्वात श्रीमंत देश एकाच बाबतीत आहे. इथे जितके प्रांत, जितक्या भाषा व बोली, तितक्याच संस्कृती आहेत. त्यात पुन्हा जातीनुसार पाठभेद आहेत. त्यांच्यातल्या वितुष्टाला आपण जबरदस्त प्रसिद्धी देतो. पण त्यांच्या जातीनुसार बदलणाऱ्या खाद्य आस्वादाची श्रीमंती विसरून जातो. एका जिल्ह्यात वा एका तालुक्यात इतकी विविधता जगातल्या कुठल्या देशात शोधूनही सापडणार नाही. त्या दिवशी सिमसनच्या घरी सर्व पदार्थ फक्त घरच्यांनीच केलेले नव्हते तर ते खास त्यांच्या कुपारी खाद्यशैलीतले होते. त्यातली वैशिष्ट्ये सांगून आग्रह धरणारी सिमसनची माऊली साक्षात भारतीय संस्कृती आहे. कारण तिच्यासह प्रत्येकाला आपल्या

संस्कृती व बोलींची फिकीर सतावते आहे.

इंग्रजीत शिकणाऱ्या मुलांना घरात आपल्या बोलीत व्यवहार नकोसे होत आहेत आणि ते करणारे आपलेच वडीलधारे मागास वाटू लागलेत, ही भयंकर मोठी वेदना आहे. तिथे याच संस्कृती व बोलीवर संशोधन करणाऱ्या अभ्यासक नेहा सावंत आलेल्या होत्या. आपल्या अनुभवातून या संस्कृतीत वाढलेल्या घरे कुटुंबे यांच्यातला गोडवा सांगताना त्यांना वेळ पुरत नव्हता. माघारी येताना सिमसनने एका पिशवीत भेट म्हणून काही वस्तू दिलेल्या होत्या आणि घरी ती पिशवी उघडली, तेव्हा मी तब्बल पन्नाससाठ वर्षे मागे बालपणात गेलो. मुंबईत तेव्हा वसईची ओळख केळ्यांचा प्रदेश अशी होती. तिथली वेलची केळी व भाजी अनेक शेतकरी मुंबईत आणून विकायचे. मागल्या दोनतीन दशकांत ती केळी बघायला मिळालेली नव्हती आणि सिमसनने नेमकी तीच केळी व घरी बनवलेली पक्वान्ने सोबत दिलेली होती. एकमेकांना भेटी देण्यात आपुलकी जिव्हाळा कितीही असला, तरी आपल्या घरातल्या व आपणच हाताने बनवलेल्या वस्तू देण्यातली श्रीमंती कुठल्याही मॉलमध्ये बघायला मिळणार नाही. हे संस्कार व विचार ज्यातून येतात तिला भाषा व संस्कृती म्हणतात. भाषा वा बोली लयाला गेली, मग ते संस्कारही अस्तंगत होऊ लागतात आणि त्याबरोबर जिव्हाळा व आपुलकीही संपुष्टात येत असते. मच्छिंद्र कांबळीने मालवणी बोली नाटकातून संपूर्ण महाराष्ट्रात पोहोचवली आणि पर्यायाने त्या संस्कृतीत वाढलेल्यांना आपली बोली कुठेही बेधडक बोलायला प्रवृत्त केले. ज्यांची ती मायबोली नाही, त्यांच्या मनात तिच्याविषयी कुतूहल व उत्सुकता निर्माण केली आणि मालवणीचे कौतुक होऊ लागल्यावर तिच्या विविध पैलूंना मानाचे स्थान मिळत गेले. तीही एक बोली आहे आणि अशा शेकडो बोली व संस्कृती मराठीला लाभलेल्या आहेत. पण किती मराठी भाषिकांना आपल्याच गोतावळ्यातल्या भाषाभगिनी ठाऊक आहेत? जागतिकीकरणाच्या जत्रेत हरवलेल्या या बोलीभाषा भगिनींना कसे पुन्हा भेटवता येईल?

सिमसनला हा प्रश्न पडतो आणि त्याला त्यात पुढाकार घ्यावासा वाटतो, याचेच अप्रूप आहे. सरकार व शासन यंत्रणा त्यांना जमेल तसे काही करतील. पण कांबळी वा त्याच्या मालवणी गोतावळ्याने जे काम केले, तसे आपण इतर मराठी बोलींसाठी काही करू शकतो काय? आज निदान डझनभर तरी मराठी उपग्रहवाहिन्या आहेत. तिथे शंभरावर तरी मालिका दाखवल्या व बघितल्या जात असतात. चित्रपट हेही माध्यम आहे. अशा माध्यमातून सुरुवात केली तर? मला तिथे साडेतीन तास झालेल्या चर्चेत एक सोपी कल्पना सुचली. प्रत्येक मराठी मालिकेत कुठल्या तरी एका बोलीभाषेतच बोलणारे पात्र घुसवले तर? एका मालिकेत कादोडीत बोलणारे पात्र असेल, तर दुसऱ्या मालिकेत अहिराणी वा वऱ्हाडीतल्या कुठल्या खास बोलीतले पात्र असावे. बाकी कथानक मराठीच चालावे. पण त्या एका पात्रामुळे ती ती बोलीभाषा महाराष्ट्रात व अन्यत्र मराठी माणूस आहे तिथपर्यंत पोहोचू शकेल ना? निदान आपल्या मराठी भाषेची बोलीभाषेत

रुजलेली हजारो पाळेमुळे त्या निमित्ताने नव्या पिढीला ओळखता येऊ लागतील ना? त्या संस्कृती व बोलींची नावे तरी कळतील ना? गडचिरोली वा धुळ्यातल्या कुठल्या टोकाला कित्येक पिढ्या जगलेल्या मराठी लोकसंख्येला, अशा आपल्याच भाषाभगिनींची ओळख होऊ शकेल. कित्येक पिढ्यांनी दोन भगिनी भेटल्याचा आनंद किती अवर्णनीय असेल? मालवणीत कादोडीचे काही शब्द असतील तर कादोडीत अहिराणीचाही काही भाग आढळू शकेल. अशा सगळ्या बोली मराठीचे सौंदर्य अधिकच वाढवतील. मला तर ह्या सगळ्या बोलीभाषा म्हणजे हरवलेला माझा गोतावळा वाटतो. त्या दिवशी सिमसनच्या घरी त्याने बोलावून हा गोतावळा भेटवला नसता, तर माझे आप्तस्वकीय किती दुरावलेत, तेही समजले नसते. वाळवंटात घर संस्कृती व आप्तस्वकियांना दुरावलेल्या सिमसनला हा योग जुळवून आणावा वाटला, यापेक्षा माझे भाग्य कुठले असू शकेल?

**पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे असते :**

मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ० भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय/परीक्षणे इत्यादी.

**व्यवसायात भाषा आणि उच्चारात सुस्पष्टता महत्त्वाची असते.**

आत्ता एका बँकेतून फोन आला.

णमस्कार सर,

मी बँकेतून बोलते आहे ...

.............लोणची काही रिक्वायरमेंट आहे का??

मी .....हो मिक्स असेल तर पाठवा..

नुस्ती कैरी मला नाही आवडत.. ..

आणि हो लोणची तुम्ही स्वत: बनवत असाल तरच. .....

समोरून फोन आपटून कट केला गेला ..

## 'भावबंधन'चे भाषावैभव

विनायक ना. गंधे

'भावबंधन' हे राम गणेश गडकरी यांचे अखेरचे नाटक. मृत्यूच्या आदल्या रात्री त्यांनी जिवाच्या कराराने ते पूर्ण केले. 'भावबंधन'चा अखेरचा प्रवेश त्यांनी पांडू बापट या आपल्या लेखनिकाला सांगितला. फौजदाराचे संवाद सांगताना; आजारी आणि मृत्युशय्येवर असलेल्या गडकऱ्यांचा आवाज वाढला होता. त्यांच्या आईने, ''लालजी, जरा हळू आवाजात सांग'' असे सांगितल्यावर ''फौजदार कधी हळू आवाजात बोलतो का'', असे गडकरी म्हणाले होते, अशी आठवण सांगितली जाते.

'एकच प्याला' आणि 'भावबंधन' या दोन्ही नाटकांचे प्रयोग गडकऱ्यांच्या मृत्यूनंतर झाले. पण या दोन्ही नाटकांनी गडकऱ्यांना विलक्षण लोकप्रियता लाभली. मराठी नाट्यसृष्टीत या दोन्ही नाटकांना अढळ स्थान प्राप्त झाले. 'एकच प्याला' आणि 'भावबंधन' या दोन्ही नाटकांच्या यशात भाषेला विशेष स्थान आहे. गडकऱ्यांची भाषा ही त्या नाटकांचे बलस्थान ठरली.

राम गणेशांची भाषा हे त्यांच्या सर्वच नाटकांचे अपूर्व वैशिष्ट्य आहे. गडकऱ्यांची ही नाट्यभाषा बहुरूपिणी आहे. तिची अनोखी रूपे आणि विभ्रम आपल्याला दीपवून टाकतात. तत्कालीन, तसेच रूढ अशा नाट्यभाषेचे अनेक संकेत गडकऱ्यांनी बाजूला सारलेले दिसतात. शब्दांची आतषबाजी, दीर्घ पल्लेदार वाक्ये, अलंकारप्रचुरता, नादमयता आणि विदग्धता इ. अनेक विशेषांमुळे ती समकालीन नाट्यभाषेपेक्षा वेगळी ठरते. किंबहुना, उत्तरकालीन नाट्यभाषा पाहताना तिचे आगळेवेगळे स्वरूप लक्षात येते.

नाटकातील भाषा आणि व्यावहारिक भाषा या दोन्हींचे प्रयोजन, विचारप्रकटीकरण आणि भावनाप्रकटीकरण असले तरी नाट्यभाषेला एक व्यापक कार्य असते. नाट्यसंहितेतील लिखित शब्द रंगमंचावर जेव्हा उच्चारला जातो तेव्हा तो अनेकविश्व परिमाणे साधणारा असावा लागतो. नाटकातून अनेक गोष्टी साध्य करण्याच्या दृष्टीने नाटककार आपल्या भाषेची योजना करीत असतो. गडकरी आपल्या भाषेच्या परिणामकारक आणि प्रभावी उपयोजनाने नाट्यवस्तूचे समग्र दर्शन घडवितात, कथानक गतिमान करतात, आपल्या भाषेतून नाट्यानुभव प्रत्ययकारी करतात. गडकऱ्यांची भाषा प्रेक्षकांना आणि वाचकांना नाट्यवस्तूशी खिळवून ठेवते. समाजजीवनातील भाषा घेऊन प्रतिमान, प्रतीक, अलंकार यांच्या साहाय्याने गडकरी आपली भाषा आशयघन आणि समृद्ध करतात. अमूर्त गोष्टींना मूर्त करण्याचे विलक्षण सामर्थ्य गडकऱ्यांच्या भाषेत आहे. केवळ भाषिक रूपातून अत्यंत प्रत्ययकारी जीवनचित्रे उभी करण्याचे कसब गडकऱ्यांच्या भाषेत आहे. अल्पायुषी राम गणेशांनी आपल्या अखेरच्या आजारात 'भावबंधन' नाटकाचे लेखन केले. या नाटकातील भावसंपन्न आणि चमकदार भाषा प्रेक्षकांना आणि वाचकांना आजवर मंत्रमुग्ध करीत आली. अप्रकाशित गडकरी या प्र.के.अत्रे यांनी संपादित केलेल्या ग्रंथातील गडकऱ्यांनी केलेल्या नोंदी पाहता याची साक्ष पटते.

अनेक चमकदार वाक्ये, शब्द, व्यक्तिरेखांचे विशेष, चमकदार कल्पना, नाट्यबीजे, जीवनातील विरोधाभास इ. गोष्टींच्या नोंदी गडकऱ्यांनी आपल्या रोजनिशीत स्मरणार्थ म्हणून लिहून ठेवलेल्या आहेत. मनात आलेल्या अनेक चमकदार कल्पना नाट्यलेखनासाठी उपयोगी पडतील म्हणून गडकरी वेळोवेळी लिहून ठेवीत.

'भावबंधन'मधील भाषावैभवाची गडकरी आधीपासूनच तयार करीत होते, यात शंका नाही. या संदर्भात प्र. के. अत्रे यांनी अप्रकाशित गडकरी या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेतील पुढील निरीक्षण मोठे उद्‌बोधक आहे. चालताना, बघताना, बोलताना, वाचताना, विश्रांती घेताना, विचार करताना कोणतीही कल्पना व विचार डोक्यात चमकून गेला की तो गडकऱ्यांनी ताबडतोब कागदाच्या कपट्यावर, वहीवर, डायरीवर किंवा पुस्तकाच्या पाठकोऱ्या भागावर टिपून बंदिस्त केला नाही, असे कधी व्हावयाचे नाही. अशा उत्स्फूर्त आणि स्फुट कल्पनांच्या टिपणकागदांच्या राशीच्या राशी त्यांनी आपल्या दप्तरात जपून ठेवलेल्या असायच्या. गडकऱ्यांच्या वाङ्‌मयनिर्मितीचा हाच कच्चा माल होय. त्यापैकी एकेक विचार आणि एकेक कल्पना निवडून काढून त्यांचा ते इतका भव्य आणि मनोज्ञ विचार करीत की तो पाहून आपण थक्क होऊन जातो आणि अचंबा करीत राहतो की एकापेक्षा एक चमत्कृतिपूर्ण कल्पनांचे विश्व गडकरी निर्माण तरी कसे करू शकले? (पृ. १८, प्रस्तावना, अप्रकाशित गडकरी)

'भावबंधन'मधील गडकऱ्यांची भाषा जितकी लखलखीत नादमय आणि आलंकारिक आहे तेवढीच ती विलक्षण भावोत्कट, रसव्यंजक, प्रासादिक आणि हृदयंगम आहे. मराठी भाषेची अनेक अनोखी नावीन्यपूर्ण रूपे तिच्यात दिसून येतात.

गडकऱ्यांच्या या नाट्यभाषेत बोलीभाषेचा रसरशीतपणा आहे आणि विदग्ध मराठीची, पंडिती वळणाची रुपेही आहेत. नाट्यानुभव समृद्ध करणारी प्रयोजक किंवा कार्यप्रवण भाषाही 'भावबंधन'मध्ये आहे. आणि नाट्यानुभवाशी फटकून वागणारी, पण स्वत:चे दिमाखदार अस्तित्व दाखविणारी शोभादायक भाषाही आहे. गडकरी सताल गद्य किती सहजपणे लिहितात किंवा भाषेच्या स्वाभाविक लयीचा किती सुंदर आविष्कार करतात, हे 'भावबंधन'मधील धुंडिराजाच्या भाषेतून प्रत्ययास येते. धुंडिराज हा 'भावबंधन'मधील एक पापभीरू कुटुंबवत्सल गृहस्थ. दुसऱ्यांची कदर करणारा आणि साधाभोळा. अचानक आलेल्या संकटाने तो गडबडून जातो. त्याने परमेश्वराला घातलेले साकडे म्हणजे एक गद्यकाव्यच आहे. तो म्हणतो,

"देवराया, तुझ्या राज्यात असा काय रे अपराध आम्ही केला की आम्हाला आपल्या दाराशी आज असे पतितांसारखे ओढून आणीत आहेस? ...

"दुसऱ्याचा पाय लागला तरी आधी आमचा नमस्कार घडला त्या आमची का रे अशी दैना व्हावी?"(अं. २, प्र.४) गडकऱ्यांनी येथे दोन समान लांबीच्या वाक्यांतून एक स्वाभाविक लय साधली आहे व त्यातून धुंडिराजच्या भावनेला उत्कट रूप दिले आहे. धुंडिराजच्या साध्या नितळ शब्दातील आळवणीला आर्तता प्राप्त झाली आहे.

मालतीच्या मनातील द्वंद्व, तिची दोलायमान अवस्था सहजसुंदर शब्दांतून किती उत्कटपणे व्यक्त केली आहे ते पाहण्यासारखे आहे. ''माझे जन्मदाते म्हणून तुमच्या गळ्याला बाबा म्हणून प्रेमाने मिठी मारु की माझ्या गळ्याला फास बांधायला तयार झाला म्हणून तुमच्यापासून दूर तोंड लपवून बसू? आजवर प्रेमाने माझी जोपासना केलीत त्याबद्दल तुमची उतराई कोणत्या शब्दांनी होऊ? उद्या माझ्या जन्माचा सत्यानाश करता आला म्हणून तुम्हाला कठोर तरी कोणत्या शब्दांनी बोलू? तोंडाकडे रागाने पाहीन म्हटले तर तुमची आतापर्यंतची उदार माया आठवून डोळ्यात आसवे उभी राहातात आणि तुमची लाडकी मुलगी म्हणून पायांवर डोके ठेवू लागले तर आताच्या बोलण्यावरून तुम्ही मला पायाखाली तुडवून टाकाल अशी धास्ती वाटते.'' ''तुमच्यापासून दूर उभी राहिले तर मायेने माझ्या डोळ्यातली आसवे पुसून टाकायला दुसरे कोणी नाही म्हणून वाईट वाटते आणि तुमच्या पदराखाली तोंड लपवायला आले तर ममतेने तोंडावरून हात फिरविता फिरविता चटकन माझ्या कपाळाचे कुंकू पुसून टाकाल अशी भीती वाटते.'' (अं. २. प्र. ४)

प्रस्तुत उताऱ्यात गडकऱ्यांनी दोन समान वजनाच्या वाक्यातून दोन परस्परविरुद्ध कल्पना मांडून तालबद्ध गद्याची निर्मिती केली आहे. विरोधी भावना व्यक्त करणारी ही वाक्ये अनलंकृत आणि साध्या भाषेत आहेत. त्यामुळे ती हृदयंगम झाली आहेत. 'भावबंधन'मध्ये भाषेची स्वाभाविक लय जपणारी अशी उदाहरणे असली तरी शोभादायक किंवा आलंकारिक भाषेची अनेक उदाहरणेही त्यात सापडतात. याचे मुख्य कारण म्हणजे भाषेची क्रीडा करणे गडकऱ्यांना आवडते. त्यांना शब्दांची आतषबाजी खूप प्रिय आहे आणि आलंकारिक भाषेची अतोनात हौस आहे. त्यामुळे भाषेच्या स्वाभाविक लयीचा आविष्कार करणारी मालती, अचानक झालेल्या मानसिक आघातामुळे वाचाळ होते. तिचे दुःख व्यक्त करताना गडकऱ्यांची भाषा अनिरुद्ध संचार करते. उदा. या देहाने, मनाने, जिवाने, दृष्टीने, दृष्टीच्या अखेरच्या आशेने, आशेच्या नुसत्या कल्पनेने, कल्पनेच्या स्वप्नाने, स्वप्नातल्या कल्पनेनेसुद्धा ही मालती आज दुसऱ्याची झाली (अं.२ प्र. ६)

भाषेच्या प्रमत्त आवेगात गडकरी केवढीतरी दीर्घ आणि पल्लेदार वाक्ये लिहितात. ती उच्चारताना रंगभूमीवरील पात्रांची दमछाक व्हावी अशी ही वाक्ये. या वाक्यातून गडकऱ्यांची भाषेवरील हुकमत जाणवते. मनोहरचे दीर्घ वाक्य या दृष्टीने पाहता येईल. ''आपल्या भाग्यशाली संसाराच्या सुखोपभोगात मग्न होऊन एखाद्या उंच इमारतीच्या गच्चीवर बसून जगाची गम्मत पाहताना हा दरिद्री मनोहर रस्त्यावरून रखडताना तुझ्या दृष्टीस पडला म्हणजे आपल्या भोवतालच्या श्रीमंत मैत्रिणींना हसविण्यासाठी केवळ करमणूक म्हणून मनोहराच्या दरिद्री वेडाची कहाणी सांग.'' (अं.२, प्र.६) वाक्प्रयोग, उपहास, उपरोध, वक्रोक्ती आणि परिहास इ. गुणविशेषांनी गडकऱ्यांची नाट्यभाषा वैशिष्ट्यपूर्ण झाली आहे. गडकऱ्यांच्या वाक्प्रयोगांचा नमुना म्हणून लतिकेने केलेल्या अपमानाचा बदला घेताना घनश्यामचे आलंकारिक आणि वक्तृत्वपूर्ण भाषेतील उत्तर पाहण्यासारखे आहे. ''आपल्या हृदयाची किंवा संमतीची या लग्नाला काडीइतकीही जरुर नाही. रविकराच्या स्पर्शाने उषेचे तोंड फिके पडते तद्वत माझ्या हस्तस्पर्शाने आपले तोंड गोरेमोरे झाले काय किंवा

रंगाऱ्याचा हात लागल्याप्रमाणे माझ्या हातांनी आपले श्रीमुख रंगून निघाले काय, मला दोन्ही प्रकार सारखेच वाटणार आहेत. लतिके, गुलाबाचा वास कसाही घेतला तरी गुलाबासारखाच यायचा.'' (अं. ३, प्र.७)

गडकरी 'भावबंधन'मध्ये जितकी काव्यमय आणि भावोत्कट भाषा वापरतात तेवढीच तर्ककठोर आणि बिनतोड युक्तिवाद असलेली भाषाही वापरतात. वृद्धापकाळात आपण लग्न करू इच्छित आहोत. या गोष्टीचे समर्थन करतान गडकऱ्यांनी धनेश्वराच्या तोंडून केलेला युक्तिवाद भाषाभिव्यक्तीचा सुंदर नमुना आहे. ''उपजत्या जिवाची जन्मपत्रिका करायची, तरुणांनी प्रणयपत्रिका लिहायच्या, म्हाताऱ्यानी मृत्युपत्रे खरडायची, या जगरुढीच्याच गोष्टी झाल्या. तरतरीत तरुणाने संन्यास घेतला किंवा एखाद्या ऐन वृद्धाने गुडघ्यातून मान काढून गुडघ्याला बाशिंग बांधले तर अभिमान! तरुण द्वारकाधीशाने सोळा हजार एकशेआठ वडील माणसे घरात आणली याचे गोळाबेरजेचे मोजमाप सांगण्यापलीकडे जगाने काय कौतुक केले? पण त्याच श्रीकृष्णाने राधेसारख्या एकाच वडील माणसाचा संसार थाटून दिला तर त्या अलौकिक चमत्काराचे अजून कोडकौतुक चालले आहे.'' (अं.२, प्र.१) धनेश्वराकडून वृद्धापकाळातील आपल्या लग्नाचे जे समर्थन गडकऱ्यांनी केले आहे ते त्यातील भाषेच्या प्रभावी उपयोजनाने बिनतोड वाटावे असे आहे. पण गडकरी आपल्या वक्रोक्तिपूर्ण भाषेची कमाल बालावृद्ध विवाहाच्या निषेधात दाखवितात. बालावृद्ध विवाहाचा निषेध करताना गडकऱ्यांनी उपरोध, उपहास, वक्रोक्ती या आयुधांचा अप्रतिम उपयोग केला आहे. बालावृद्धविवाहातील, निर्दयतेचा आणि क्रौर्याचा गडकरी प्रभाकराच्या तोंडून जो समाचार घेतात. तो गडकऱ्यांच्या वक्रोक्तिपूर्ण भाषेचा विलक्षण असा नमुना आहे. "बालावृद्ध विवाहापेक्षा गैर जगात आहे तरी काय? बाकी एका अर्थी साठीच्या सुमारातला नवरदेव आणि आठीच्या आटोक्यातली नवरी मुलगी अशी जोडी परस्परांना अनुरूप तरी खरीच! बालवधू गुडघ्यात मान घालून बसलेली आणि वृद्ध वराची वयोभारामुळे गुडघ्यात मान आलेली! कंबरेची कमान झाल्यामुळे दोघांची उंचीही सारखीच. वराच्या अंगाला वार्धक्यामुळे कंप सुटत असतो तर त्या बापड्या बालिकेच्या अंगाचा भीतीने थरकाप होत असतो! वधूचे दुधाचे दात पडू लागतात तर तिकडे वराचे कायमचे दात पडत असतात. वधूवरांची अनुरूपता यापेक्षा आणखी ती कोणती असायची?" (अं.२, प्र.२)

प्रसंगानुसार आणि पात्रांनुसार बहुधा गडकऱ्यांची नाट्यभाषा अवतरत असली तरी गडकऱ्यांच्या वाङ्मयीन प्रकृतीचे खास विशेष तिच्यातून पुनः पुन्हा डोकावताना दिसतात. भाषेची उर्ध्वगामी फेक हे गडकऱ्यांच्या नाट्यभाषेचे एक वैशिष्ट्य आहे. या रचनेत वाक्यातील उत्तरार्ध उंच जाणारा आणि बहुधा प्रश्नार्थक असतो.

उदा. १) लहानपणी घेतलेला माझ्या ताटलीतला दूधभाताचा घास अजून तिच्या गळ्याखाली उतरला नसेल तोच तुम्ही त्यावर सुरा फिरवायला उभे राहिला? (अं.३, प्र.३)

२) कुबेराचे भांडार दारावरून जाऊ लागले तरीसुद्धा ज्याने ते नुसते पाहण्यासाठी तुमच्यावरून

क्षणभर नजर हलविली नसती तो दीडदमडीच्या दागिन्यांचा लोभ धरील का? (अं. २, प्र.४)

आपली भाषा काव्यमय आणि उत्कट करण्यासाठी गडकरी विरोधावर आधारित प्रतिमानांचा विशेष उपयोग करतात. त्यामानाने साम्यावर आधारित असलेल्या प्रतिमानांचा कमी उपयोग करतात. विरोधी कल्पना व विरोधी प्रतिमाने हे गडकऱ्यांचे खरे वैभव आहे, असे 'भावबंधन'मधून जाणवते.

उदाहरणार्थ :- १) पतिरूपी खरा अलंकार कुंकवाच्या सौभाग्याने नावानिशी रेखाटण्यासाठी आधी कपाळाचे मातापितरांचे सुख पुसून काढावे लागते. (अं.१, प्र.३)

२) कधीकधी लग्नाच्या मांडवातली आरास साजरी करण्यासाठी एखाद्या जित्या जिवाची चिता भडकवावी लागते. (अ.१, प्र.४)

३) माझ्या ताईच्या सुखाच्या होळीत हृदय होरपळून निघत असताना लतिकेच्या प्रेमळ दृष्टीची चंद्रिका मला काय सुख देणार! (अं.२, प्र.२)

४) भरलेल्या पोटाच्या भांडवलावर रिकाम्या डोक्यात सैतान आपला कारखाना घालतो. (अं२, प्र.३)

५) कपाळी कुंकू लाभले आहे म्हणून हसायला लागू की कपाळ फुटके म्हणून रडत बसू? (अं.२, प्र.४)

६) या तुझ्या पोरक्या पोरीवर मायेचे पांघरुण घालण्यासाठी तुला कधी वर बघून हाक मारली नाही पण आज बाबांच्या अब्रुवर पांघरुण घालण्यासाठी मात्र तुला टाहो फोडून हाक मारते. (अं.३, प्र.३)

७) सुंदर तारा अक्षय आहेत पण दुर्लभ आहेत. आणि सहज लाभण्यासारखी फुले क्षणिक आहेत. (अं.३, प्र.६)

८) जगाच्या बाजारात निर्व्याज दयेची हुंडी ओळखीवाचून व्यवहारी मनाला पटत नाही. (अं. ४, प्र.३)

साम्यावर आधारित असलेल्या प्रतिमानांतून गडकरी सौंदर्यपूर्ण आशय व्यक्त करतात. उदाहरणार्थ ...नक्षत्रांच्या पसाऱ्यातून नेमक्या चंद्रावर दृष्टी खिळून राहिली तर त्यात चूक कोणती झाली? (अं.१, प्र.२)

नव्याने पायमल्ली होऊ लागली म्हणजे मेल्या कातड्यांची वहाणसुद्धा थोडी कुरकूर करते. (अं.३, प्र.३)

नदीला सासरी पाठवताना पर्वताचेसुद्धा पाषाणहृदय फुटल्याखेरीज राहात नाही. (अं.१. प्र.२)

मनाने जिवंत असताना जित्या जगाच्या जाचण्या चुकविण्याच्या हेतूने आयुष्याचे शेवटचे टोक गाठण्यासाठी जितेपणीच एकदम या स्मशानात येऊन बसणे म्हणजे लवकर कालक्षेप करण्यासाठी घड्याळाचे काटे पुढे सरकवण्याइतकेच हास्यास्पद आहे. (अं.४, प्र.१)

अनुप्रासात्मक वाक्यांची, शब्दांची गडकऱ्यांना अतोनात हौस आहे. 'भावबंधन'मध्ये अशी बरीचशी अनुप्रासात्मक वाक्ये आणि शब्दबंध आहेत.





अनुक्रमणिका

उदा. आज इतकी वर्षे जिवापाड जपून तुम्ही या प्रभाकराचा पिंड पोसून साडेतीन हात वाढविला आहे. (अं.२, प्र.२)

वृद्ध वराच्या थेरड्या थोबाडाच्या बोळक्याची बालवधूच्या चूलबोळक्यांच्या चिमुकल्या साजात भर पडेल (अं.२, प्र.२)

प्रेमाच्या परमेश्वरा, आजवर प्रीतीच्या कोमल प्राणपुष्पांनी आपली चरणसेवाच करीत आले. (अं.२, प्र.६)

प्रेमाच्या मंगल चित्रा, प्रीतीच्या पवित्र परमेश्वरा, आज मी तुझा निरोप घेणार. (अ. २, प्र.६)

आता या काळ्याकुट्ट कोकिळांना कर्कश कंठ केव्हा फुटणार? (अ.३, प्र.१)

कोटिक्रमयुक्त बोलणे हे गडकऱ्यांच्या वाङ्मयीन प्रकृतीचे वैशिष्ट्य आहे. गडकरी त्यांच्या लौकिक जीवनातही कोटिक्रमयुक्त बोलत असत. असे 'अप्रकाशित गडकरी'मधील नोंदीवरून दिसते. तसेच गडकरी चरित्रातूनही अशी उदाहरणे सापडतात. कोटिक्रमयुक्त बोलण्याच्या संदर्भात गडकऱ्याचे काय मत होते, ते त्यांनी मालतीच्या संवादातून सांगितले आहे. मालती म्हणते, "कुणाच्या मनाला दुखविल्यावाचून एखाद्या वेळी सहजगत्या बोलण्यात चटकदार कोटिक्रम होऊन गेला तरच त्याची शोभा" (अं.४, प्र.३) कोटिक्रमाबाबत गडकऱ्यांचे असे भाष्य असले तरी गडकऱ्यांच्या बहुतेक व्यक्तिरेखा कोट्या करताना दिसतात. 'भावबंधन'मधील कोटिक्रम गडकऱ्यांची भाषेवरील हुकमत दाखवितो. भाषेचे नवे आकृतिबंध सिद्ध करतो; भाषेचे अभिव्यक्तिसामर्थ्य दाखवितो.

उदा. १) रावणाच्या दहा तोंडांवर रामबाण औषध मिळेल पण हे तोंड असाध्य आहे. (अं.१, प्र.१)

२) इतक्या दिवसाच्या परिचयाने मुक्याला वाचाळता कशी येते, हा प्रीतिशास्त्रातला पहिला धडा तुला तोंडपाठ झाला असता. (अं १, प्र.२)

३) तोंडाला तोंड दिलेस तरी मुक्याचे व्रत सोडणार नाही. (अं.१, प्र. २)

४) मग तोंड दुखेपर्यंत मघाशी माझ्या तोंडाची तारीफ करीत होता, ती का? (अं.२,प्र.२)

५) प्रेमावाचून परदेशी होण्यापेक्षा प्रेमासाठी परदेशी झालेले काय वाईट? (अं.१, प्र.३)

६) मात्र एक अक्षर कुठे बडबडलास तर असा चतुर्भुज होण्याऐवजी तसा चतुर्भुज होशील (अं.१, प्र.४)

७) जीव गेला तरी मी एकटा म्हणून स्मशानात जायचा नाही. (अं१, प्र.३)

८) रत्न पोटात गिळून जीव देण्यापेक्षा पोटचे कन्यारत्न देऊन जीव वाचवलेला काय वाईट? (अं.२, प्र.१)

९) आज या घराला रामराम ठोकण्यापेक्षा घटकाभर हा जुलमाचा रामराम पत्करला (अं.२, प्र.३)

१०) ज्याच्या अंगात जीव नसेल त्याने जीव द्यावा. (अं.३, प्र.३)

११) माझे डोळे उघडले तरी मी तुझ्या भीतीकडे अशी डोळेझाक करीत आहे. (अं.५, प्र.१)

१२) कोणीही खुशाल डोळे मिटून आम्हा आंधळ्यांवर दया करावी. (अं.२, प्र.५)

'भावबंधन'मध्ये सुभाषितवजा वाक्ये येतात. ही वाक्ये अल्पाक्षररमणीय आणि सूत्रबद्ध आहेत. गडकरी त्यातून अमोल भावसत्ये प्रकट करतात. या वाक्यांनी 'भावबंधन'ची भाषा अर्थसंपृक्त झाली आहे. उदाहरणार्थ,

१) सौंदर्य हे परमेश्वर स्वरूप आहे. (अं.१, प्र.२)

२) यौवनाच्या पहिल्या प्रहरात प्रीतीच्या मंदिराभोवती गालाच्या गुलाबी ठाण्यावर लज्जेचा नाजूक पहारा असतो.(अं.१, प्र.२)

३) जाळावाचून कढ नाही आणि मायेवाचून रड नाही. (अं. १, प्र.२)

४) प्रीती कधी जिभेने बोलत नाही, ती ओठावर थरथरते, गालावर रंगते आणखी डोक्यात तरंगते (अं.१, प्र.२)

५) स्त्रियांच्या सुंदर सिद्धान्ताला सत्यापेक्षा सौंदर्याचेच जास्त साह्य असते. (अं.१, प्र.२)

६) संसाराच्या संगीताचा नेहमी बागेश्रीत प्रारंभ होऊन भैरवीत शेवट होतो. (अं.१, प्र.२)

७) पाप धृतराष्ट्रासारखे आंधळे आहे आणि शंभर पुत्रांना जन्म देणारे नाही. (अं.१, प्र.२)

८) आईबापांना मुलांना जन्म देता येतो. त्यांना मरण देता येत नाही. (अं.१, प्र.३)

९) प्रीती हा एक नेत्ररोग आहे. (अं.१, प्र.३)

१०) मांजरीच्या पिलांचे डोळे दहाव्या दिवशी आणि कुत्रीच्या पिलांचे डोळे एकविसाव्या दिवशी उघडतात पण माणसाच्या पोरांचे डोळे मात्र एकविसाव्या वर्षापर्यंत उघडत नाहीत. (अं.२, प्र.१)

११) हृदय ही एकच वस्तू जगातल्या सर्व सुखांची हेतुभूत आहे आणि ही एकच वस्तू अशी आहे की जी देऊन देता येत नाही आणि मागून मिळत नाही.(अं.१, प्र.२)

१२) पापाची फळे गोड असली तरी पचायला फार जड हेच खरे (अं.२, प्र.१)

१३) भरलेल्या पोटाच्या भांडवलावर रिकाम्या डोक्यात सैतान आपला कारखाना घालतो. (अं.२, प्र.३)

१४) संसारात पडण्यापूर्वी तरुण जिवाला वाटत असते की प्रेम परमेश्वरस्वरूप आहे. पण शेवटी प्रत्ययास येत जाते की परमेश्वर प्रेमस्वरुप आहे. (अं.२, प्र.६)

१५) दु:ख जितके मंदगती आहे तितकेच सुख चंचल आहे. (अं.३, प्र.६)

व्याकरणदृष्ट्या या भाषेची स्वरुपचिकित्सा केल्यास तिची अपूर्वता जाणवते. गडकऱ्यांसारखा शब्दप्रभू नवीन शब्द निर्माण करतो, शब्दबंध आणि नवे सामासिक शब्द तयार करतो. नव्या वाक्प्रयोगांची प्रतिष्ठापना करतो. गडकऱ्यांना नावीन्याचा सोस आहे. हा सोस त्यांच्या लखलखीत कांतिमान भाषेतून दिसतो. 'भावबंधन'मध्ये असे नवीन शब्द दिसतात. काही वेळा जुन्या रूढ शब्दांना गडकरी नवीन झळाली देतात. उदाहरणार्थ - बड्या बारदानाचा कारखाना (मोठा कुटुंबकबिला), मुक्ताफळाची ओवाळणी (बेताल बडबड), यथोबुज (सविस्तर), अपेष्टा (हालअपेष्टा या शब्दातील अपेष्टा या शब्दाचा स्वतंत्र वापर), शब्दसूर (बडबडे), पाचपेच (सारासार विचार)पाचपोच या शब्दाशी साम्य, अशा शब्दांबरोबर समक्षासमक्ष (समोरासमोर)

असे अनेक अभ्यस्त शब्द गडकरी वापरतात. गडकऱ्यांनी 'भावबंधन'मध्ये अनेक नवे सामसिक शब्द वापरले आहेत. उदा. गर्भश्रीमान (गर्भश्रीमंतशी साम्य) मीनाबाजार (मासळीबाजार), कृपाविषय, कर्मकटकट, कसाबकरणी, करुणाश्रू, शापकठोर, कुबेरकन्या, लग्नबंध (लग्नबंधनाशी साम्य), तिथिनिश्चय (मुहूर्त), जन्मसंबंध, वल्लभरमणी, तोंडमिळवणी, अनर्थपात.

'भावबंधन'मध्ये गडकऱ्यांनी अनेक नवे वाक्प्रचार रूढ केले आहेत. उदा. १) प्राणावर दरोडा पडणे = प्राणावर बेतणे २) संघष्ट्ण असणे = सलगी असणे ३) मोकळ्या जिभेने बोलणे = खूप बडबडणे ४) देवाजीच्या कारणी पडणे = देह ठेवणे ५) जिम्मा होणे :- समावेश असणे ६) सात जन्माचा सलोखा करणे = सात जन्म बरोबर राहणे ७) जिवाला उकडल्यासारखे होणे = काही सुचेनासे होणे, अस्वस्थ वाटणे. ८) प्रेमाची मंडई मांडणे = प्रेमाचा बाजार मांडणे ९) प्रचार असणे = रिवाज असणे. १०) नशिबाने कोलांट्याउड्या मारणे = सुखाबरोबर दु:खाचा अनुभव घेणे.

गडकऱ्यांच्या खास अन्वर्थक आणि अभिनव विशेषणांनी 'भावबंधन'ची भाषा समृद्ध झाली आहे. उदा. निर्बुज जग, आखबंद डोक्याचा माणूस, ताजी माणसे. इंग्रजीतील स्थानांतरित विशेषण पद्धतीचा (ट्रान्सफर्ड एपिथेटस्) गडकऱ्यांनी मोठ्या प्रमाणात उपयोग केला आहे. अनेक अमूर्त गोष्टींना गडकऱ्यांनी अन्वर्थक विशेषणे लावली आहेत. उदा. भाग्यशाली आशा, सत्याची उग्र तीव्रता, बेवकूफ सोंग, बेजबाबदार पातक, ओशाळवाणे ऋण, म्हातारडी आत्महत्या, निर्जीव स्वाभिमान, भाग्यशाली अधिकारी. अशा विशेषण- विशेष्यांच्या जोड्यातून गडकरी सौंदर्यपूर्ण व चमत्कृतिजनक अर्थनिर्मिती करताना दिसतात.

अनुप्रासात्मक विशेषण हा गडकऱ्यांच्या भाषेचा खास प्रांत आहे. पुढील उदाहरणे सांगता येतील. उतावळी उत्सुकता, थेरडे थोबाड, तीव्र त्वरा, विद्रुप वळणे, सुखाची सतेज स्वप्नचित्रे, आठीच्या ओटोक्यातली (नवरी), गुंतलेला गळा, उतावळा उद्धटपणा, चटोर चोपड्या, प्रेमाची पाचकळ मराठी पुस्तके, मुक्या मनाची करपल्लवी, कडू कानडीचा काढा.

गडकऱ्यांच्या नाटकांमध्ये भाषेची समृद्ध आणि नावीन्यपूर्ण रूपे दिसतात. गडकरी इंग्रजी व संस्कृत भाषेचे चांगले जाणकार होते. या भाषांच्या व्यासंगाने त्यांच्या बहुरुपिणी भाषेला अनेक धुमारे फुटलेले दिसतात. आपल्या संस्कृतीचे अनेक विशेष आत्मसात करून त्यांचा सुंदर आविष्कार गडकऱ्यांनी आपल्या नाट्यभाषेतून केला. गडकरीय भाषेचे मनोहारी इंद्रधनुष्य निश्चितच त्यांच्या साहित्य साधनेतून निर्माण झाले आहे. या भाषेने अभिजातवादी वळण गिरविले तशीच सौंदर्यवादी वृत्तीही प्रकट केली. या दोन्ही प्रवृत्तींचा सुरेख संगम गडकऱ्यांच्या भाषेत आहे. लखलखीत, कांतिमान, नादमय भाषेचे गडकऱ्यांना मूलत:च आकर्षण असावे. भाषेच्या उपयोजनाच्या बाबतीत गडकऱ्यांना संयम मान्य नसावा. किती सांगू? कोणकोणत्या पद्धतीने व्यक्त करू? असे गडकऱ्यांना होत असावे. त्यामुळे त्यांच्या भाषेला एक आवेगी प्रमत्त रूप प्राप्त होते.

या भाषेला उत्कटता येते, ही भाषा विलक्षण काव्यमय होते. अशा वेळी गडकऱ्यांना नाट्यप्रसंगांच्या बंदिस्तपणाचे भान राहात नाही. गडकरी भाषेची मुक्तपणे उधळण करीत राहतात.

प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख यांनी 'गडकऱ्यांची संसारनाटके' या आपल्या ग्रंथाच्या प्रास्ताविक टिपणात गडकऱ्यांच्या भाषेचा गौरव करताना म्हटले आहे की, ''गडकऱ्यांच्या भाषेची कांती व तेजस्विता, तिचा लवचिकपणा व तिचे लाघव, तिचे नादानुसंधान व तिची नृत्यगर्भता, तिची जाणकारी व तिचे अर्थानुसरण इतके अपूर्व ठरले की तिला सर्वच क्षेत्रात अजिंक्यपद व मानाचे मुजरे मिळत गेले.''

'भावबंधन'मध्ये प्रा. सरदेशमुखांच्या वरील विधानाचा प्रत्यय येतो. गडकऱ्यांनी आपल्या नाटकांमधून भाषेची अनेक मनोहर रूपे सादर केली. शब्दवैभव दाखविले. मराठी भाषेला नवे शब्दबंध आणि वाक्प्रचार दिले. 'भावबंधन'ची भाषा त्याचे वैभव आहेच. त्याबरोबर ती मराठी भाषेचेही वैभव ठरली आहे.

**विरामचिन्हे - गोविंदाग्रज (राम गणेश गडकरी)**

जेव्हा जीवनलेखास जगतीं प्रारंभ मी मांडिला,
जो जो दृष्टिंत ये पदार्थ सहजी वाटे हवासा मला!
बाल्याची पहिली अशी बदलती दृष्टी सदा बागडे,
तेव्हा 'स्वल्पविराम' मात्र दिसती स्वच्छंद चोंहीकडे!
आहे काय जगांत? काय तिकडे? हें कोण? कोठें असें?
जें तें पाहुनि यापरी भकतसे, दृक् संशये टाकित,
सारा जीवनलेख मी करितसे तै 'प्रश्नचिन्हां'कित,
अर्धांगी पुढती करी वश मना शृंगारदेवी नटे,
अर्धे जीवन सार्थ होइल इथें साक्षी मनाची पटे;
प्रेमानें मग एकजीव बनतां भूमीवरी स्वर्ग ये !
केला 'अर्धविराम' तेथ; गमलें येथून हालूं नये !
झाली व्यापक दृष्टि; चित्त फिरलें साश्चर्य विश्वांतरीं,
दिक्कालादि अनंतरूप बघतां मी होत वेडयापरी !
सूक्ष्मस्थूलहि सारखीं भ्रमविती; लागे मुळीं अंत न,
त्याकाळी मग जाहलें सहजची 'उद्गार' वाची मन ।
आशा, प्रेम, नवीन वैभव, तशी कीर्तिप्रभा, सद्यश -
हीं एकेक समर्थ आज नसतीं चित्ता कराया वश ।
सर्वांचा परमोच्च संगम चिरं जेथे असे जाहला,
देवा ! 'पूर्णविराम' त्या तव पदीं दे शीघ्र आतां मला !

## व्यवसायाची भाषा

प्रेषक - सुशान्त देवळेकर

- **समाज-माध्यमांतून प्रसृत झालेला मूळ मजकूर**

**एल. एल. बी. चा वर्ग :**

**प्राध्यापक :** जर तू एखाद्याला संत्रे देणार असशील तर काय सांगशील ?

**विद्यार्थी १ :** हे घे संत्रे.

**प्राध्यापक :** अरे असं नाही. वकिली भाषेत सांग.

**विद्यार्थी १ :** मी स्वतः पूर्ण शुद्धीत आणि कोणत्याही दबावाशिवाय, हे फळ, ज्याला संत्रे असे म्हटले जाते, ज्यावर माझा पूर्ण मालकी हक्क आहे, त्याच्या साल, रस, बियांसहित आपणास देत आहे. त्याचबरोबर हे संत्रे फ्रीजमध्ये ठेवून देण्याचा, कापण्याचा, सोलून खाण्याचा किंवा रस काढून पिण्याचा हक्क ही आपणास देत आहे. आपण इतरही एखाद्या व्यक्तीला हे फळ त्याचे साल, रस, बियांसहित अथवा त्याशिवाय हस्तांतरित करण्याचा अधिकारही मी आपल्याला देत आहे.
मी याद्वारे हे घोषित करतो की, या संत्र्यासंदर्भात यापूर्वीचे कोणत्याही प्रकारचे भांडण,वादविवाद असल्यास, याची संपूर्ण जबाबदारी माझीच असेल. यानंतर या फळाशी माझा काहीही संबंध नसेल.

**प्राध्यापक :** आपले चरणकमल कुठे आहेत.....?

- **प्रस्तुत मजकुरावरले लेखकाचे भाष्य**

**विद्यार्थी २ :** ज्याअर्थी, पक्ष १ (मी) पक्ष २ ला (एखादा) एक फळ, ज्याला संत्रे असे म्हणतात ते, देऊ करत आहे;

आणि ज्या अर्थी, पक्ष १ त्यावर आपला पूर्ण मालकीहक्क असल्याचे जाहीर करत आहे;

आणि ज्या अर्थी, पक्ष १ ते फळ साल, रस आणि बियांसहित पक्ष २ ला देत आहे;

आणि ज्या अर्थी, पक्ष १ हे फळ फ्रीजमध्ये ठेवून देण्याचा, कापण्याचा, सोलून खाण्याचा किंवा रस काढून पिण्याचा हक्कही पक्ष २ ला देत आहे;

आणि ज्या अर्थी, पक्ष १ एखाद्या व्यक्तीला हे फळ त्याचे साल, रस, बिया ह्यांसहित अथवा त्याशिवाय हस्तांतरित करण्याचा अधिकारही पक्ष २ ला देत आहे;

आणि ज्या अर्थी, पक्ष १ ह्या संत्र्यासंदर्भात यापूर्वीचे कोणत्याही प्रकारचे भांडण,वादविवाद असल्यास, याची संपूर्ण जबाबदारी आपलीच असेल व ह्यानंतर ह्या फळाशी आपला काहीही संबंध नसेल असे घोषित करत आहे;

त्याअर्थी पक्ष १ आणि पक्ष २ ह्यांच्यामध्ये एक व्यवहार, ज्याला संत्र्याची देवघेव असे म्हणणे शक्य आहे तो, होण्याची शक्यता आहे असे उपलब्ध पुराव्यांच्या आधारे म्हणता येईल.





अनुक्रमणिका

लेख

# बोधात्मक अर्थविज्ञान, संकल्पनानिर्मिती व भाषिक प्रकटीकरण

अरविंद जाधव

## विषयप्रवेश

सदर लेखात संकल्पनांचे स्वरूप, संकल्पनानिर्मिती व संकल्पनांचे भाषिक प्रकटीकरण याबाबत टाल्मीने मांडलेल्या सिद्धान्ताचे विवेचन केले आहे. बोधात्मक अर्थविज्ञान या शाखेच्या निर्मितीतील लिओनार्द टाल्मीचे योगदान पायाभूत व सर्वाधिक आहे. तो या शाखेचा जनक आहे, त्यामुळे त्याच्याव्यतिरिक्त या शाखेचा विचार निरर्थक ठरतो. बोधात्मक अर्थविज्ञान ही बोधात्मक भाषाविज्ञानाची शाखा असून दोन्ही शाखांना संपूर्णतः वेगळे करता येत नाही. त्यामुळे लेखात दोहोंची चर्चा अपरिहार्य असली तरी बोधात्मक अर्थविज्ञानावर अधिक भर दिला आहे. टाल्मीबरोबरच लेकॉफ, लँगॅकर, फोकोनी, इत्यादींचे बोधात्मक अर्थविज्ञानातील कार्यही महत्त्वाचे आहे. मात्र लेखात या सर्वांच्या विचारांची सखोल चर्चा न करता प्रामुख्याने टाल्मीचे संशोधन विचारात घेतले आहे. ही चर्चा व्यक्तिकेंद्रित नसून विचारकेंद्रित आहे व त्यामध्ये टाल्मीच्या १९७२ ते २०१६ या काळात केलेल्या संशोधनाचा वाटा आहे, हे संशोधन आजही सुरूच आहे.

## बोधात्मक अर्थविज्ञानाचे स्वरूप

बोधात्मक अर्थविज्ञान ही बोधात्मक भाषाविज्ञानाची एक सैद्धान्तिक शाखा आहे. या शाखेत भाषेच्या आकलनाच्या दृष्टीने अभ्यास केला जातो. संवेदना, अवधान, नियंत्रण, निर्णयक्षमता, स्मृती, इ. बोधात्मक संरचनेप्रमाणेच भाषासुद्धा अशीच एकबोधात्मक संरचना आहे. उपरोक्त बोधात्मक संरचनांचा भाषेवर परिणाम होत असतो तसेच भाषेचा परिणाम हा वरील संरचनांवर होत असतो. वर नमूद केलेल्या व इतर विविध संरचनांची मिळून मानवी समग्र बोधात्मक संरचना-प्रणाली बनलेली असते. बोधात्मक भाषाविज्ञान अर्थास केंद्रीभूत मानून कार्य करीत असल्याने बोधात्मक भाषाविज्ञान व बोधात्मक अर्थविज्ञान यामध्ये बरेच साम्य आहे. या लेखात टाल्मीच्या बोधात्मक अर्थविज्ञानाविषयक विचारांची चर्चा केलेली आहे. प्रथम बोधात्मक भाषाविज्ञानातील बांधिलकी तत्त्वे व भाषेच्या विविध स्तरांत कार्यरत असलेली काही सामायिक तत्त्वे यांचा उल्लेख केला आहे. त्यानंतर बोधात्मक अर्थविज्ञानाच्या मार्गदर्शक तत्त्वांचा समावेश आहे. त्यानंतर या शाखेतील प्रमुख संकल्पना, अर्थनिर्मितीप्रक्रिया व त्यांस कारणीभूत घटकांची चर्चा येते.

### बोधात्मक भाषाविज्ञानाची बांधिलकी तत्त्वे

बोधात्मक भाषाविज्ञानात सामान्यीकरण बांधिलकी व बोधात्मक बांधिलकी ही बांधिलकीची दोन तत्त्वे पाळली जातात (लेकॉफ १९९०). इवान्स् आणि ग्रीन (२००६: पृ. २७-

२८) यांनी ही बांधिलकी तत्त्वे व भाषेतील विविध स्तरांना जोडणारी सामायिक तत्त्वे पुढीलप्रमाणे विशद केली आहेत.

बोधात्मक भाषाविज्ञानाच्या सामान्यीकरण बांधिलकीच्या एका गृहीतकानुसार भाषेच्या विविध घटकांना जोडणारी काही सामायिक तत्त्वे असावीत आणि अशी तत्त्वे शोधणे, हे भाषाविज्ञानाचे एक प्रमुख कार्य आहे. भाषेच्या रूपाधारित पद्धतीनुसार, विशेषतः चॉम्स्कीच्या उत्पादक / जनकसूत्री व्याकरण पद्धतीनुसार ध्वनिविचार, शब्दविचार, वाक्यविचार व अर्थविचार हे पूर्णतः भिन्न विभाग(स्तर) असून त्यांचे कार्य वेगवेगळ्या पद्धतीने चालते. बोधात्मक भाषावैज्ञानिकांच्या मते भाषाभ्यासाच्या सोयीसाठी आपण ध्वनिविचार, शब्दविचार, वाक्यविचार व अर्थविचार अशा संज्ञा वापरणे गैर नाही. मात्र ते स्वतंत्र विभाग असून त्यांचे कार्य वेगवेगळ्या पद्धतीने चालते हे त्यांना मान्य नाही. याउलट त्यांच्या मते या सर्व विभागांचे कार्य एकत्रित चालते. उदा. वर्गीकरण, विविधार्थिता व रूपक या तिन्ही तत्त्वांनुसार भाषेचे कार्य हे समग्र आकलनाचा भाग असल्याचे स्पष्ट होते.

**वर्गीकरण** (कॅटॅगरायझेशन) तत्त्वानुसार वर्गीकृत घटकांतील सीमा या अस्पष्ट असतात, त्या 'हो-नाही' सारख्या टोकाच्या किंवा सुस्पष्ट नसतात. उदा. 'कप' या संकल्पनेत कमी अधिक उंचीचे, रंगाचे व आकाराचे विविध धातूचे, काचेचे, व प्लॅस्टिकचे कितीतरी प्रकारचे कप समाविष्ट असतात. मात्र सर्वच संकल्पना या कपाच्या केंद्रीय (प्रोटोटाइप) संकल्पनेभोवती कमी अधिक अंतराने पण संलग्न अशा असतात. या वर्गीकरणाचा सखोल अभ्यास मनोवैज्ञानिक रॉश (१९७७) यांनी मांडला. त्यानंतर भाषाशास्त्रीय वर्गीकरणाच्या दृष्टिकोनातून टेलर (२००३) यांनी त्याचा अभ्यास केला.

**विविधार्थिता** (पॉलिसेमी) तत्त्वानुसार एकच भाषिक घटक भिन्न अर्थ दर्शवितो. मात्र ते भिन्न अर्थ एकमेकांशी संलग्न असतात. बोधात्मक भाषाविज्ञानाच्या मते विविधार्थिता हे तत्त्व फक्त शब्दरचनेशी संबंधित नसून ते भाषेच्या विविध विभागात (स्तरांवर) कार्यरत असते. बोधात्मक अर्थविज्ञानाच्या दृष्टिकोनातून विविध भाषांमध्ये विविधार्थितेचा अभ्यास केला गेला. त्यामध्ये इंग्रजीतील शब्दयोगी अव्ययांचा टायलर आणि इवान्स् (२००३) हे वानगीदाखल उदाहरण देता येईल.

**रूपक** (मेटॅफर) हेही मानवी भाषेचे महत्त्वपूर्ण तत्त्व आहे. भाषेत एक संकल्पना दुसऱ्या संकल्पनेच्या आधारे पद्धतशीर व्यक्त केली जाते. अर्थविस्तारीकरण हे रूपकाचे प्रमुख अंग आहे. रूपकतत्त्वही भाषेतील विशिष्ट विभागाच्या मर्यादेबाहेरही कार्य करते. लेकॉफ रुपकाची रचना व दैनंदिन जीवनातील महत्त्व विशद करतो. रूपकाकडे फक्त आलंकारिक दृष्टिकोनातून न पाहता त्याचे मानवी विचारप्रक्रियेतील पायाभूत स्थान लेकॉफ साहित्याच्या (लॅकॉफः १९८७) व मानवी मेंदूविज्ञानाच्या अभ्यासाद्वारे सिद्ध करतो (लॅकॉफः २०१३).

संक्षेपात असे नमूद करता येईल की, भाषेची वर्गीकरण, विविधार्थिता, रूपक, इ.

पायाभूत तत्त्वे भाषेच्या विविध विभागात भूमिका बजावतात. सामान्यपणे भाषेचा अभ्यास अशा प्रकारे एकत्रित करणे इष्ट ठरते. त्याचे विविध विभाग करून ते एकमेकांपासून अगदीच भिन्न असल्याचे मानणे गैर होईल. प्रचलित अशी आशयात्मक व्यवस्था (खुला शब्दवर्ग) व व्याकरणात्मक व्यवस्था (मर्यादित शब्दवर्ग) यांचे एकत्रीकरण करण्यात बोधात्मक भाषाविज्ञानातील बांधिलकीचे पहिले तत्त्व -सामान्यीकरण- बऱ्याच अंशी यशस्वी झाले.

बोधात्मक बांधिलकीच्या तत्त्वानुसार, बोधविज्ञानाच्या इतर अभ्यासशाखांतून मांडलेल्या मानवी बोधासंबंधी सामान्य बाबी भाषेच्या रचनांतूनही व्यक्त होतात (भाषेसंबंधीच्या विशिष्ट बोधात्मक बाबी नव्हे). त्याचबरोबर बोधात्मक बोधविज्ञान मनाची विभागणी-पद्धत (मॉड्युलर थेअरी) नाकारते. भाषाविज्ञानाच्या रूपाधारित पद्धतीनुसार, भाषेसाठी स्वतंत्र विभाग असून त्याचे कार्य इतर आकलनापेक्षा भिन्न स्वरुपाचे असते.

बोधविज्ञान (कॉग्निटिव्ह सायन्स) या संदर्भात अवधान (अटेन्शन) हे बोधात्मक तत्त्व विशद करते. उदा. मानसशास्त्रात नमूद केल्याप्रमाणे, आपण पाहिलेल्या कोणत्याही दृश्याचे दोन भागात वर्गीकरण होते: आकृती व पृष्ठभाग. दृश्यातील अधिक महत्त्वाच्या घटकासाठी आकृती ही संकल्पना वापरली जाते, तर इतर कमी महत्त्वाचा भाग पृष्ठभाग म्हणून कार्य करतो, ज्यामुळे आकृती अधिक स्पष्ट होते. भाषेतील प्रत्येक वाक्याचेही अवधानाच्या दोन भागात वर्गीकरण होते. वाक्यातील (ऐकणाऱ्याच्या दृष्टीने) महत्त्वाच्या भागावर अधिक लक्ष केंद्रीत होते व कमी महत्त्वाच्या भागाकडे तो कमी प्रमाणात लक्ष देतो (दुर्लक्ष नव्हे!). केवल वाक्यात हा भाग वाक्याच्या सुरूवातीस येतो. उदा. 'राम वनवासाला गेला' या वाक्यातील 'राम' हा आकृती (अधिक महत्त्वाचा) तर वनवास हा पृष्ठभाग (कमी महत्त्वाचा) ठरतो. भाषाविज्ञानात वाक्यातील अधिक महत्त्वाच्या घटकास सेलियन्स ही संकल्पना आहे. आपण वरील उदाहरणावरून पाहिले की अवधान वितरण हे तत्त्व दृश्याचे आकलन करून घेताना दृश्यात्मक अवधान(व्हिजवल अटेंशन), तर भाषेतील वाक्याचे आकलन करून घेताना श्रवणात्मक अवधान(ऑडिटरी अटेंशन) कार्यरत असल्याचे आढळते.

**बोधात्मक अर्थविज्ञानाची मार्गदर्शक तत्त्वे**

इवान्स् (२००७: पृ. ६) यांनी नमूद केल्याप्रमाणे वरील दोन बांधिलकी तत्त्वांप्रमाणेच बोधात्मक अर्थविज्ञानाची चार मार्गदर्शक तत्त्वे आहेत: (१) सांकल्पनिक रचना ह्या मानवी संवेदनाजन्य (एमबॉडिड) असतात, (२) आर्थिक रचना म्हणजेच सांकल्पनिक रचना होत, (३) अर्थाचे स्वरुप हे कोशात्मक (त्रोटक) नसून ज्ञानात्मक (अधिक संपन्न) असते, व (४) अर्थनिर्मिती म्हणजेच संकल्पनानिर्मिती होय.

**टाल्मीचे बोधात्मक अर्थविज्ञानविषयक विचार**

टाल्मीच्या मते, संकल्पनात्मक रचनेचे भाषिक प्रकटीकरण हे बोधात्मक भाषाविज्ञानाच्या अभ्यासाचा केंद्रिभूत घटक आहे. यामध्ये तो फोकोनी (१९८५), फोकोनी व

टर्नर (२००२), फिलमोर (१९७५, १९७६), लेकॉफ (१९८७, १९९२), लँगॅकर (१९८७, १९९१), टाल्मी (२०००), आणि गिरार्टस् व कुखेनस् (संपा. २००७) इ. कार्यांचा उल्लेख करतो. त्याच्या मते, भाषाविज्ञानाचा अभ्यास करणारे तीन दृष्टिकोन आहेतः रूपाधारित, मानसिक व संकल्पनात्मक. बोधात्मक भाषाविज्ञान हे यांतील संकल्पनात्मक दृष्टिकोनातून भाषेचा अभ्यास करते, तसेच भाषेचे रूपाधारित व मानसिक घटकही विचारात घेते.

रूपाधारित दृष्टिकोन भाषेचा वाक्यविचार व शब्दविचार यांचा अभ्यास करतो, पण रूपाधारित दृष्टिकोनाचा मानसिक व संकल्पनात्मक बाबींशी असलेला संबंध मर्यादित आहे. यामध्ये प्रामुख्याने व्याकरणिक रचनांचा आर्थिक रचनेशी असलेला संबंध तपासला जातो. त्यादृष्टीने पुष्कळसे चांगले कामही झाले आहे, पण भाषेच्या समग्र सांकल्पनिक व्यवस्थेबाबत हा दृष्टिकोन भाष्य करीत नाही. भाषिक रचनांचा अभ्यास करण्यासाठी जितके आवश्यक आहे, तेवढाच अर्थविचारातील भाग व मानसिक प्रक्रियांचा अभ्यास या दृष्टिकोनात समाविष्ट असतो.

मानसिक दृष्टिकोन भाषेकडे संवेदना, स्मृती, अवधान, व विचारप्रक्रिया या इतर बोधात्मक व्यवस्थेप्रमाणे पाहतो. यामध्ये सांकल्पनिक दृष्टीने आर्थिक स्मृती, संकल्पनांतील साधर्म्य, वर्गीकरणाची रचना, अनुमान व संदर्भ यांसारख्या गोष्टींचा समावेश होतो. पण हा दृष्टिकोनही भाषेची समग्र सांकल्पनिक संरचना, संकल्पनानिर्मिती व त्यांचे भाषेतील प्रकटीकरण याबाबत पुरेसा खुलासा करत नाही.

बोधात्मक भाषाविज्ञानाचा सांकल्पनिक दृष्टिकोन हा सांकल्पनिक ज्ञानाचे स्वरुप, त्याची रचना व प्रक्रिया आणि त्याचे भाषेच्या माध्यमातून होणारे प्रकटीकरण या घटकांचा अभ्यास करते. यामध्ये मुख्यत्वे, काळ व अवकाश, घटना व दृश्ये, वस्तू व प्रक्रिया, स्थान व गती, आणि बल व कार्यकारण भाव यासारख्या अत्यंत पायाभूत अशा सांकल्पनिक घटकांचा अभ्यास केला जातो. याचप्रमाणे मानसिक प्रक्रियांवर प्रभाव टाकणाऱ्या घटकांत, अवधान व दृष्टिकोन, इच्छा/ संकल्प व हेतू/ उद्देश, आणि अपेक्षा व परिणाम इ. घटकांचा समावेश होतो. यामध्ये शब्दांची रूपे व वाक्यरचना यांच्या अर्थरचनांचाही अभ्यास केला जातो. याचप्रमाणे अनुक्रमे रूपकात्मक रचना, आर्थिक चौकट, मजकूर व संदर्भ यांचा सांकल्पनिक रचनांशी असलेला संबंध याचाही अभ्यास केला जातो. थोडक्यात, भाषेतील सांकल्पनिक रचनांचा वैश्विक स्वरुपाचा अभ्यास हा बोधात्मक भाषाविज्ञानाच्या अभ्यासाचा प्रमुख उद्देश आहे.

बोधात्मक भाषावैज्ञानिकांच्या मते, भाषेने संघटित केलेला संकल्पनात्मक आशय म्हणजेच अर्थ होय. साधारणपणे मानवी विचारांमध्ये भाषिक अर्थ समाविष्ट असतो, त्याचबरोबर भाषिक अर्थ मानवाच्या साधारण विचार संकल्पनेतील काही घटकांवर अवलंबून असतो.

रोनाल्ड लँगॅकर वाक्यातील प्रत्येक रूपिमाचा व रचनेचा एकूण वाक्याच्या अर्थास होणारा उपयोग पद्धतशीरपणे मांडतो, तर टाल्मी व लेकॉफ यांच्या मते, वाक्यरचनेतील प्रत्येक घटकाशिवाय अशी काही तत्त्वे आहेत की ज्यांचा अर्थावर अधिक परिणाम होतो. त्याचप्रमाणे

लेकॉफने मांडलेल्या, एमबॉडीमेंट थेसिसचा (मानवाचे दैनंदिन विविध प्रकारचे अनुभव, त्यास जाणवणाऱ्या विविध संवेदना, मानवास लाभलेली विशिष्ट शरीररचना व चेताव्यवस्था इ. मुळे त्यांचे होणारे विशिष्ट आकलन) लॅंगॅकर व टाल्मी काही प्रमाणात विस्तार करतात, तर काही प्रमाणात त्या सिद्धान्ताचा विरोधही करतात.

कार्यात्मक भाषाविज्ञान अभ्यासपद्धतीच्या जवळ जाणाऱ्या बोधात्मक भाषाविज्ञानात वाक्यबंधाचा अभ्यास हा परिघात्मक असून कार्यात्मक भाषाविज्ञानात तो केंद्रस्थानी असतो. याकेनडॉफची *संज्ञानात्मक अर्थविज्ञान* ही पद्धती बोधात्मक भाषाविज्ञानासारखी आहे, मात्र तो अर्थ स्पष्ट करताना गणितीय सूत्रपद्धती सोडत नाही. टाल्मीच्या मते, ही पद्धत मुख्यत्वे भाषिक अर्थच्छटा व अर्थबदल यांबाबत कमी पडते. तसेच बोधात्मक भाषाविज्ञान याकेनडॉफच्या अवकाशीय रचनेपर्यंतचा अभ्यास, कालिक रचना, बल व कार्यकारणभाव, बोधात्मक स्थिती, सत्यता, इ. बाबींसाठीही वापरले जाते.

**व्याकरणव्यवस्थेचे अर्थविज्ञान**

टाल्मीच्या मते, भाषेच्या सार्वत्रिक वैशिष्ट्यानुसार अर्थ समाविष्ट असलेल्या घटकांचे आशयात्मक शब्दव्यवस्था (खुला गट) व व्याकरणिक शब्दव्यवस्था (मर्यादित गट) असे दोन विभाग पडतात. त्यांस खुला व मर्यादित गट असे संबोधण्याचे कारण म्हणजे खुल्या गटात मोठ्या प्रमाणात शब्द समाविष्ट असतात, तसेच आणखीही शब्द सहजरित्या समाविष्ट होऊ शकतात, तर मर्यादित गटातील शब्दांची संख्या खूपच कमी असून त्यात नवीन शब्द सहजी समाविष्ट होत नाहीत. टाल्मीच्या मतानुसार, खुल्या गटात प्रामुख्याने नाम, क्रियापद, व विशेषणांच्या मूळरुपांचा समावेश होतो, तर मर्यादित गटात विविध प्रत्यय, शब्दयोगी अव्यय, उभयान्वयी अव्यय, इ. शब्दांबरोबरच शब्दक्रम, नाम वा कर्ता यासारख्या संज्ञा इत्यादींचा समावेश होतो (टाल्मी १९८३: पृ. २२-२४). तसेच खुला गट सांकल्पनिक आशय व्यक्त करतो, तर मर्यादित गट सांकल्पनिक संरचना व्यक्त करतो. विशिष्ट भाषेतील सांकल्पनिक संरचना-प्रणाली ही समग्र (वैश्विक) संरचना-प्रणालीचाच भाग असते.

**व्याकरणावरील अर्थाची मर्यादा :** वरील दोन गटापैकी खुल्या गटामार्फत जे विविध अर्थ व्यक्त होतात ते अमर्यादित असतात, पण मर्यादित गटामार्फत ठरावीक प्रकारच्या गोष्टीच व्यक्त होतात. उदा. जगातील बहुतांशी भाषा मर्यादित गटाच्या घटकामार्फत वचन व्यक्त करतात, पण मर्यादित गटाच्या घटकामार्फत रंग व्यक्त करू शकेल अशी कोणतीही भाषा जगात नाही. वचनातही मर्यादित गटाचे घटक एकवचन, द्विवचन किंवा अनेकवचन यासारख्या गोष्टी व्यक्त करतात, पण सम, विषम, डझन किंवा मोजता येणाऱ्या गोष्टी त्याद्वारे व्यक्त होत नाहीत.

**व्याकरणाचे वलनशीलता तत्त्व :** भाषेच्या अर्थनिर्मितीची तत्त्वे ही युक्लीडीयन पद्धतीची (काटेकोर अथवा अचूक अंतर, आकार, कोन, इ.) नसून ती वलनशील, लवचिक, साधारण जवळ जाणारी असतात. ती आवाका अथवा आकार याबाबत उदासीन (तटस्थ) असतात. उदा. आत हे शब्दयोगी

अव्यय वाटी**त,** पेटी**त,** देशा**त,** जगा**त,** इ. ठिकाणी वापरले जाईल. आपण अनुक्रमे वाटी, पेटी, देश व जग यांचा आकार लक्षात घेतल्यास याची प्रचीती येईल.

**आकृतीबंधीय (ढाच्यात्मक) रचना :** भाषेतील अर्थाच्या संकल्पना या आकृतीबंधात्मक असतात. भाषेतील एका रूपिमास आकृतीबंध असे संबोधतात. संकल्पनानिर्मितीत आकृतीबंधीय संरचना सर्वात जास्त महत्त्वाची असते. यामध्ये भौमितिक रचना, दृष्टिकोन, अवधान वितरण, इ.चा समावेश होतो.

**(१) भौमितिक रचना :** ही भाषेतील मर्यादित गटाचे आकृतीबंध हे काळ, अवकाश किंवा इतर सांकल्पनिक रचना या भौमितिक पद्धतीने प्रकट करतात. उदा. अवकाशीय शब्दयोगी, कालिक उभयान्वयी, कालिक प्रत्यय, इ.चा समावेश होतो.

टाल्मीने वापरलेली ही नवीन संकल्पना पूर्वीच्या एकवचन, द्विवचन, अनेकवचन, इ. गोष्टींसाठी अधिक योग्य आहे. त्याच्या मते एकत्व (युनिफ्लेसिटी) हे खुल्या गटामार्फत दर्शविले जाते, तर त्याचे अनेकत्व (मल्टिफ्लेसिटी) भाषेचा मर्यादित गट दर्शवितो. ही संकल्पना वस्तूंच्या, गोष्टींच्या, व्यक्तिच्या बरोबरच क्रिया, प्रक्रिया, घटना, इ.बाबतही लागू होते. उदा. वीज चमकली, विजा चमकल्या, विजा चमकत राहिल्या, विजा दोन तास चमकत (राहिल्या) होत्या इ. मध्ये वीज हे एकत्व दाखविते तर विजा अनेकत्व, त्याचप्रमाणे चमकणे एकत्व दाखविते, तर चमकत राहणे अनेकत्व. अनेकत्वातून एकत्व किंवा एकत्वाचे अनेकत्व करणे हे बोधात्मक (मानसिक) प्रक्रियेद्वारे केले जाते.

बोधात्मक घटकानुसार एखादी वस्तू विशिष्ट (खऱ्या वा काल्पनिक) सीमांनी बद्ध आहे किंवा नाही यावर त्याचे बोधन अवलंबून असते. यामध्ये सीमायुक्त व सीमामुक्त वस्तू असे दोन घटक आहेत. उदा. तळं हे सीमायुक्त आहे, तर पाणी हे सीमामुक्त आहे.

**(२) दृष्टिकोन :** बोलणाऱ्या वा ऐकणाऱ्या व्यक्तीचे वास्तविक वा काल्पनिक ठिकाण (वॅन्टेज पॉइन्ट), अंतर, दिशा, इ. बाबी भाषेतील अवकाशीय व कालिक रचना समजावून घेताना आवश्यक आहेत (टाल्मी २०००). उदा. 'दरवाजा उघडून दोन लोक घरात आले' या वाक्याचा बोध करून घेताना हे लक्षात येईल की व्यक्तीचे वास्तविक वा काल्पनिक ठिकाण (वॅन्टेज पॉइन्ट) घराच्या आत असेल. तर 'दोन लोक दरवाजा उघडून घरात गेले' या वाक्याचा बोध करून घेताना हे लक्षात येईल की व्यक्तीचे वास्तविक वा काल्पनिक ठिकाण (वॅन्टेज पॉइन्ट) घराच्या दरवाज्याच्या बाहेर असेल. वाक्याचे व्याकरण पाहिल्यास दोन बाबी लक्षात येतील: (१) वाक्यात सर्वप्रथम येणारा भाग (दरवाजा की दोन लोक), व्यक्तीचे अवधान अनुक्रमे पहिल्या वाक्यात प्रथम दरवाजाकडे जाईल व नंतर त्याला वा तिला दोन लोक दिसतील. दुसऱ्या वाक्यात व्यक्तीचे लक्ष प्रथम दोन लोकांच्याकडे जाईल व नंतर दरवाजा व घरातील आतील भागाकडे जाईल. (२) दुसरी बाब अशी की वाक्यात वापरलेले क्रियापद (आले वा गेले), त्यावरूनही बोध होतो. इंग्रजीमध्ये एंटर या क्रियापदावरून आले वा गेले या गोष्टी शब्दांवरून लक्षात येत नाहीत, तेव्हा त्या वाक्यात

सर्वप्रथम येणारा भाग व वॅन्टेज पॉइन्ट वरूनच लक्षात घ्याव्या लागतील.

**(३) अवधान वितरण :** ऐकणाऱ्याचे अवधान बोलणाऱ्याच्या कोणत्या गोष्टीवर किती प्रमाणात वितरित होते, याचा परिणाम त्या गोष्टीच्या ग्रहणावर अथवा बोधावर होतो (टाल्मी २०००, २००७). उदा. तुमचे अवधान वाचनावर अधिक प्रमाणात असेल तर तुम्हास वाचत असलेल्या गोष्टींचे आकलन अधिक होईल, पण त्याच वेळी तुमच्या मनात इतर काही विचार चालू असतील व त्यावर तुमचे अवधान अधिक प्रमाणात एकवटले असेल, तर तुम्ही वाचत असलेल्या गोष्टींचा तुम्हाला नीट बोध होणार नाही.

**(४) बल-गतिविज्ञान :** मानव हा पृथ्वीच्या सर्वसमावेशक गुरूत्वाकर्षण संकल्पनेचा वापर करीत असतो. विविध क्रिया-प्रतिक्रियांचा तो दैनंदिन जीवनात सतत अनुभव घेतो व त्याप्रमाणे कार्ये करीत असतो. या सर्व बाबींचा परिणाम त्याच्या विचारावर व भाषेवर होतो. बलगतिविज्ञानाच्या दृष्टीने टाल्मी दोन घटकांची रचना मांडतो - बल प्रविष्ट करणारा घटक (ॲगॉनिस्ट) व ज्यावर बल प्रविष्ट होते तो घटक (ॲन्टॅगॉनिस्ट). यामध्ये एक घटक (बल-प्रबलक) दुसऱ्या घटकावर (बल-विरोधक) बल प्रविष्ट करतो. दुसऱ्या घटकावर(बल-विरोधक) त्याचा परिणाम होतो किंवा प्रविष्ट बलास विरोध करतो. त्याच्या या विरोधामध्ये तो(बल-विरोधक) बल-प्रबलकापेक्षा प्रबळ असेल तर यशस्वी होतो अन्यथा अयशस्वी होतो आणि पर्यायाने पहिला घटक (बल-प्रबलक) यशस्वी होतो. भाषेतील अवकाशीय व कालिक संकल्पनांचा, रचनांचा, घटनांचा व परिणामांचा अभ्यास करताना या बाबींचा विचारही आवश्यक ठरतो (टाल्मी १९८८). उदा. (१) चेंडू थांबला. (२) मालकाने घोड्याला दिवसभर पळविले.

आपणास ज्ञातच आहे की न्यूटनच्या पहिल्या नियमानुसार अवकाशातील (आकाशातील नव्हे) कोणतीही चल वस्तू चल राहते, तर अचल वस्तू अचल राहते व अचल वस्तूचा वेगही समान राहतो. अवकाशातील कोणत्याही वस्तूचा नैसर्गिक कल एकतर चल (मोटिव्ह) राहण्याकडे असतो वा अचल (ॲट रेस्ट) राहण्याकडे असतो.

पहिल्या वाक्यात चेंडूचा नैसर्गिक कल पळत राहण्याकडे आहे, पण काही अडथळ्यामुळे वा वाऱ्याच्या वेगामुळे तो थांबला. यामध्ये चेंडू हा घटक प्रबलक आहे, तर त्याच्या थांबण्यासाठी कारणीभूत असणारा घटक बल-विरोधक आहे. दुसऱ्या वाक्यात मालक हा प्रबलक आहे, तर घोडा हा विरोधक आहे. घोड्याचा नैसर्गिक कल अचल राहण्याकडे आहे, मात्र मालकाने अधिक बल प्रविष्ट केल्याने घोड्याला पळत राहावे लागले. बध्यता (बाउंडेडनेस) ही दिवसभर या शब्दाने व्यक्त झाली आहे.

(५) **आकृती-पृष्ठभाग व्यवस्था :** ही मानसशास्त्रातील अत्यंत महत्त्वाची संकल्पना टाल्मीने भाषेच्या रचना अभ्यासण्यासाठी वापरली. वर (५.३) नमूद केल्याप्रमाणे, अवधानाच्या बाबतीत, व्यक्ती त्याने पाहिलेल्या दृश्याची विभागणी, आकृती व पृष्ठभाग या घटकांत करतो. आकृती ही अधिक महत्त्वाच्या गोष्टीकरिता वापरली जाते, तर दृश्यातील इतर भागाकडे पृष्ठभाग म्हणून पाहिले

जाते. टाल्मीने गेस्टाल्ट मनोविज्ञानातील या गोष्टींचा भाषेत कसा वापर होतो याचे सविस्तर विश्लेषण केले आहे (टाल्मी १९७२, १९७५, १९८३, २०००).

**समारोप :** या लेखात मुख्यतः टाल्मीच्या बोधात्मक अर्थविज्ञानाचे विश्लेषण केले आहे. मानवी संकल्पनांचे स्वरूप, रचना, घडण, व संकल्पनांचे भाषेतील प्रकटीकरण याबाबत सविस्तर मांडणी केली आहे. याचबरोबर भौमितिक रचना, दृष्टिकोन, अवधान वितरण, बल गतिविज्ञान आणि कार्यकारणभाव, व आकृती-पृष्ठभाग संकल्पना यांचे संकल्पनानिर्मितीतील स्थान विशद केले आहे. टाल्मीच्या बोधात्मक अर्थविज्ञानाचा जगातील भाषांच्या तुलनात्मक अभ्यासासाठी वापर केला जात आहे. भारतातील भाषिक वैविध्य लक्षात घेता मराठी व अन्य भारतीय भाषांच्या संशोधनास (काळ व अवकाश, घटना व दृश्ये, वस्तू व प्रक्रिया, स्थान व गती, आणि बल व कार्यकारणभाव इ. घटकांच्या अनुशंगाने) टाल्मीचे बोधात्मक अर्थविज्ञान नक्कीच उपयुक्त ठरेल.

*[**टीप.** सदर लेखात मराठीत उपलब्ध नसलेल्या बऱ्याच संज्ञा लेखकाने प्रथमच वापरल्या आहेत, वाचकांनी त्यापेक्षा अधिक योग्य संकल्पना सुचविल्यास पुढील लेखात नक्कीच विचार होईल. आपल्या सविस्तर प्रतिक्रिया लेखकाच्या ई-पत्यावर लिहून पाठवाव्यात.*

*__ऋणनिर्देश:__ या लेखाच्या संपादनामध्ये प्रा.डॉ. सोनल कुलकर्णी-जोशी यांचे प्रोत्साहन व मार्गदर्शन लाभले. तसेच श्री संभाजी जाधव यांनी या लेखाचे प्रथम वाचन करून काही मौलिक सूचना केल्या.]*

**राम गणेश गडकरी**

जन्म - २६ मे १८८५ (गणदेवी, जि. नवसारी, गुजराथ राज्य)

मृत्यू - २३ जानेवारी १९१९ (सावनेर, जि. नागपूर, महाराष्ट्र राज्य )

**गडकऱ्यांचा लेखनसंसार**

- **नाटके -** एकच प्याला, गर्वनिर्वाण, पुण्यप्रभाव, प्रेमसंन्यास, भावबंधन, मित्रप्रीती (अप्रकाशित), राजसंन्यास, वेड्याचा बाजार
- **काव्यसंग्रह -** वाग्वैजयंती
- **विनोदी लेखन -** संपूर्ण बाळकराम आणि 'रिकामपणची कामगिरी' ('मासिक मनोरंजन' मध्ये आलेल्या लेखांचा संग्रह )
- **अन्य साहित्य -** चिमुकली इसापनीती (जाणीवपूर्वक एकही जोडाक्षर नसलेल्या कथा),





अनुक्रमणिका

### गोविंदाग्रज (राम गणेश गडकरी) यांच्या काही कविता

- **माझी पहिली कविता** (१८९६ जून किंवा जुलै)

(आमचा एक वृध्द गुजराथी शेजारी, रोज दुपारी जेवण झाल्यावर आमच्या घरी येऊन गप्पागोष्टी सांगत बसत असे, त्यांचे पुढील आर्येत वर्णन केलेले आहे. माझे वडिलबंधु ती. विनायक गणेश गडकरी यांना या काव्याला थोडी मदत केली होती. मु.गणदेवी, प्रांत नवसारी, संस्थान गायकवाडी)

**आर्या**

चष्मा लावुनि डोळयां डोकिस पागोटी तांबडी घाली.
काटी टेकित टेकित येऊनि बैसे पथारिच्या खाली ॥१॥

---

- **केशवसुत मेले ?** (लेखनकाल : १९ फेब्रुवारी १९११)

जगतास जागवायाला केशवसुत गाउनि गेले !
इंग्लंद भूमि शेलेची माहेर जडाचें बनले,
सन्देश गूढ जे त्याचे तैसेच मानसीं जिरले,
तपोवना मानवतेच्या या बघतां मानस हंसले!
देवाचे हेतु न पुरले,
अर्धेच कार्य जे उरले,
ते येथे करुनी गेले,
अवतरुनी फिरुनी शेले ! केशवसुत गाउनि गेले!

(...................)

सर्व ठायि सर्वही काळी सर्वांनी त्यास पहावें,
पाहतां पाहतां वाटे डोळयांनी ज्यास गिळावें,
तो विषय होई मरणाचा जन बोले काय करावें ?
जे चकव्यावाचुनि चकले,
जरि ते कुणि कांहीं भकले,
तरि 'गोविंदाग्रज' बोले
केशवसुत कसले मेले? केशवसुत गातचि बसले !

---

- **वाचकांस विज्ञापन**

**शार्दूलविक्रीडित**

जे जे या समयी मनात भरले स्वच्छंद नानास्थळी,
ते ते त्या समयी जपून धरिता ही होय गंगाजळी !
मित्रा ! ही कविता-न गद्य-इजला निर्बंध कैचा बरे ?
सारे हे मनि आणुनी मग धरी 'वाग्वैजयंती' करे ॥१॥

**वसंततिलका**

प्रेमे, सख्या धरी हिला हृदयी सदाही,
दे टाकुनी; तुडवि ही अथवा पदांही !
माते दशा समचि या गमतात दोन्ही
माझी मलाच लखलाभ सदा असो ही ॥२॥





अनुक्रमणिका

## मराठी अभ्यास परिषदतर्फे दिल्या जाणाऱ्या
## महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कारासाठी निवडलेल्या पुस्तकाचा परिचय

*भाषाग्रहण आणि भाषाशिक्षण* या रमेश पानसे यांच्या लेखसंग्रहरूपी पुस्तकात लहान मुलं भाषा कोणत्या वयात शिकतात किंवा कोणत्या वयात जास्त चांगली ग्रहण करू शकतात ह्या विषयी मौलिक स्वरूपाचे विचार सुलभपणे मांडले आहेत. त्याचबरोबर त्यामागे असलेली मज्जाभाषाशास्त्र (न्युरोलिंग्विस्टिक्स) आणि मेंदूतील भाषिक केंद्रे- उदा. शब्द ऐकणे, त्यानंतर त्याचे आकलन होणे आणि त्यावरची प्रतिक्रिया देणे ह्या वेगवेगळ्या क्रियांसाठी मेंदूमध्ये विशिष्ट केंद्रे किंवा बिंदू असतात. त्याविषयीचा अभ्यास करून शास्त्रज्ञांनी मांडलेल्या सिद्धान्तांचा सविस्तर विचार पुस्तकात केला आहे.

या अभ्यासानुसार मुलं वयाच्या सहाव्या वर्षांपर्यंत एक किंवा अनेक भाषा उत्तमप्रकारे शिकू शकतात. फक्त त्यासाठी पालकांनी, पाल्याला त्याप्रमाणात- तितकी भाषा ऐकण्याच्या, पाहण्याच्या संधी दिल्या पाहिजेत. त्याचं फलित म्हणजे शालेय पूर्वप्राथमिक शिक्षण सुरु होण्यापूर्वी मुलं भाषेचे आकलन व पुनर्बांधणी – आकलनासहित प्रतिसाद देणे – ह्या क्रिया उत्तम प्रकारे करू शकतात. मुलांना कोणतीही भाषा नीट बोलता येण्यासाठी प्रथम पालक आणि नंतर शिक्षक यांनी थोडे प्रयत्न केल्यास मुलांची भाषिक अभिव्यक्ती चांगली होईल. सहाव्या वर्षापर्यंत मुलांच्या मेंदूत भाषाग्रहण/शिक्षण तंत्र (लँग्वेज ॲक्विझिशन डिव्हाईस) हे उपजतच क्रियाशील असते. फक्त त्याला थोडी प्रेरणा देण्याची गरज आहे. ती तशी जाता/येता, जागृत पालक/शिक्षक देऊ शकतात.

एकदा स्वभाषेतील उच्चार आणि अभिव्यक्ती सफलतेने जमल्यावर, नवीन भाषा शिकायला अडचण येत नाही. मुलांचं भाषाग्रहण आणि भाषाशिक्षण याविषयीची वैज्ञानिक बैठक सांगून, त्या अनुषंगाने येणारे – माध्यम इंग्रजी/मराठी, याविषयी मूलगामी विचार मांडलेले दिसतात.

तसेच, बालपणापासून भाषा चांगली यावी – म्हणजे उच्चार, लेखन, आकलन – प्रतिसाद पुनर्निर्माण याबाबतीत मुलं सक्षम व्हावी यासाठी माधुरी पुरंदरेंच्या 'लिहावे नेटके', 'वाचू आनंदे' ह्या अतिशय उपयुक्त अशा छान पुस्तकांचाही आढावा पानसेंनी घेतला आहे.

बालवयातच जर भाषा तिच्या सर्व कौशल्यांसह चांगली अवगत झाली, तर पुढे मोठेपणी भाषा समजण्यात –त्या त्या भाषेत लिहिण्यात अडचणी येणार नाहीत. असे मौलिक विचार अगदी सोपेपणाने मांडून डॉ. रमेश पानसे यांनी समाजात भाषाशिक्षाणाविषयी जागृती आणण्याचे काम केले आहे.

'भाषा आणि जीवन'सारख्या जीवनाचे अविभाज्य अंग असलेल्या भाषेला वाहिलेल्या पत्रिकेकडे *भाषाग्रहण आणि भाषाशिक्षण* या पुस्तकाचा महाबँक पुरस्कारासाठी प्रस्ताव करणे सर्वथैव योग्य वाटते.

डॉ. शुभांगी कर्डिले     डॉ. अपर्णा झा     डॉ. कल्पना कुलकर्णी

# मराठी शब्द-हौशी

सोनाली देशपांडे-गुजर

**भाषाध्यापन आणि भाषिक खेळ :**

मानवी भाषा आणि मानवेतर प्राण्यांची भाषा यांत फरक आहे हे आपण जाणतोच. अर्थातच भाषा अध्ययन आणि अध्यापन हे मानवी भाषेबाबतच शक्य आहे हेही आपल्याला माहीत आहे. संवादाचे आणि एकूणच संप्रेषणाचे एक प्रभावी माध्यम असलेल्या मानवी भाषेची आपल्याला माहीत असलेली ही काही वैशिष्ट्ये. -

- भाषा हे संवादाचे साधन आहे.
- मानवेतर प्राण्यांना काही प्रमाणात संवाद साधता येतो, पण त्यामागे स्वजातिसंरक्षण किंवा स्वजातिसंवर्धन या जैविक प्रेरणा असतात.
- माणसाच्या भाषानिर्मितीमागील प्रेरणा केवळ जैविक असत नाहीत, तर त्या सामाजिकही असतात.
- मानवी भाषा नवनिर्मितिक्षम असते आणि तिला ध्वनींबरोबरच व्याकरणाचीही सोबत असते.
- मानवी भाषा शिकता आणि शिकवता येतात.
- मानवी भाषांना स्थलकालाची मर्यादा नसते.
- भाषा ही प्रामुख्याने मौखिक असते, लेखन हे तुलनेने दुय्यम असते.
- जशी संगणकामध्ये एखादी आज्ञावली साठवलेली असते तशी भाषा शिकण्यासाठी एक जैविक कळ मानवी मेंदूत असते. आपण एकमेकांच्या भाषा शिकू शकतो, शिकतो. म्हणून या भाषांचे अध्ययन अधिकाधिक सोपे आणि अध्यापन अधिकाधिक प्रभावी कसे करता येईल, त्यासाठी कोणती तंत्रे वापरता येतील याकडे लक्ष देणे गरजेचे आहे.

भाषाध्यापनाचे पारंपरिक तंत्र हे प्रामुख्याने व्याकरण आणि भाषांतर या अंगाने जाणारे आहे. ते चुकीचे जरी नसले तरी प्रभावी खचितच नाही. लहान मूल जेव्हा भाषा शिकते तेव्हा ते व्याकरण आधी शिकत नाही, तर बोलायला म्हणजेच भाषेचा मौखिक वापर करायला आधी शिकते. ती त्याच्या कुटुंबाची निजभाषा असली तरी त्या मुलासाठी ती नवीनच असते. ते मानवी मूल असल्याने त्याला कोणतीही मानवी भाषा जन्मत:च अवगत नसते. आजूबाजूच्या माणसांना बोलताना ऐकून ते मूल ती भाषा शिकत जाते. हेच कोणत्याही परकीय भाषेच्या बाबतीत म्हणता येईल. कोणतीही परभाषा शिकताना थेट व्याकरणापासून सुरुवात करून किंवा दुसऱ्या माहीत असलेल्या भाषेचा आधार घेऊन ती शिकवणे फारसे परिणामकारक होत नाही. त्याऐवजी आधी लक्ष्यभाषेत (जी भाषा शिकायची आहे ती) संवाद करायला शिकवण्यावर अधिक भर देऊन नंतर तिच्या व्याकरणाकडे वळणे आणि अध्ययनाच्या काठीण्यपातळीनुसार आवश्यक तिथेच भाषांतर वापरणे अधिक प्रभावी ठरते.

जागतिकीकरणाच्या वाढत्या प्रभावामुळे भाषा शिकण्याच्या जुन्या पद्धती बदलण्याची गरज निर्माण झाली आहे. युरोपीय आणि काही इतर परदेशी भाषा शिकण्याच्या आंतरराष्ट्रीय पद्धती पाहता भारतीय भाषांच्या अध्यापनाच्या बाबतीतही हे बदल होणे गरजेचे आहे.

युरोपीय भाषाध्यापनाच्या संवादात्मक पद्धतीचा विचार करता ती पद्धत उपरोक्त पारंपरिक पद्धतीपेक्षा अत्यंत वेगळी आहे. व्याकरणाचा बागुलबुवा न करता भाषाध्ययन अधिकाधिक सोपे आणि रंजक, तरीही परिपूर्ण कसे होईल, याकडे ही पद्धत लक्ष देते. ही पद्धती विद्यार्थीकेंद्री आहे. परस्परसंवाद, समूहात काम, प्रकल्प वगैरे गोष्टी शिक्षणात अंतर्भूत करण्याने ही पद्धती अधिक प्रभावी ठरली आहे. या पद्धतीचा एक अविभाज्य भाग म्हणजे भाषिक खेळ.

भाषिक खेळ वापरण्याचे मुख्य कारण म्हणजे शिकताना सर्व ज्ञानेंद्रियांचा वापर होतो, हे होय. जलद शिकण्यासाठी सर्व ज्ञानेंद्रियांचा वापर अधिक उपयुक्त ठरतो. त्यासाठी सर्व प्रकारचे खेळ – लेखी, तोंडी, शारीरिक – वापरले जाऊ शकतात. जेणे करून पंचेंद्रिये वापरून शिकणे सुलभ आणि रंजकही होऊ शकेल. पण शिकणे रंजक करून त्यातील गांभीर्य नष्ट तर होणार नाही ना? असा प्रश्न अनेकांना पडू शकतो आणि तो तसा पडणे स्वाभाविक आहे. आपण वर्षानुवर्षे पारंपरिक पद्धतीने शिकत-शिकवत आलो आहोत. अगदी एखादी नवीन भाषा परभाषकांना शिकवण्याची वेळ येते तेव्हाही आपण कोणती पद्धत वापरतो? व्याकरण? भाषांतर? पण त्यातून भाषाशिक्षणाबद्दल रस किती निर्माण होतो आणि भीती किती वाटते हा प्रश्नच आहे. भाषांतर, व्याकरण आणि पाठांतर यांच्या चक्रात अडकून भाषाध्ययन जड आणि अवघड वाटून त्याकडे विद्यार्थ्यांचा ओढा कमी होतो. भाषिक खेळ वापरून हे टाळणे शक्य आहे.

वर ज्या संवादात्मक पद्धतीचा उल्लेख केला ती प्रामुख्याने परकीय भाषाध्यापनाची पद्धती आहे. परभाषकांना एखादी भाषा शिकवताना ती वापरली जाते. आता आपण इथे निजभाषकांना मराठी शिकवण्यासाठी या पद्धतीचा, विशेषत: भाषिक खेळांचा उपयोग कसा करून घेता येईल ते पाहू.

निजभाषकांना त्यांचीच भाषा शिकवणे हे अधिक आव्हानात्मक असते. कारण ती आपलीच भाषा आहे, ती येतेच आपल्याला, त्यात काय शिकायचे, असा एक (गैर)समज मनाशी बाळगून निजभाषक विद्यार्थी याकडे पाहात असतात. त्यांचा हा गैरसमज दूर करून त्यांना भाषा-अध्ययनाकडे घेऊन येणे आणि शिवाय त्यात त्यांना रस निर्माण करणे हे एक आव्हानच! इथे भाषिक खेळ फारच चांगला हातभार लावू शकतात.

**भाषिक खेळ हे तंत्र प्रभावी का आहे? :**

- प्रेरणा हे मुख्य कारण. भाषा शिकण्यासाठी प्रेरणा देण्याचे काम हे खेळ करू शकतात. शिकण्यातला रस कायम ठेवण्यात त्यामुळे मदत होते.
- वाचन, लेखन, श्रवण, पाठांतर यांमुळे येणारे शैथिल्य जाते आणि शिकण्यात उत्साह येतो.





अनुक्रमणिका

- खेळातून लवकर शिकले जाते.
- सांघिक भावना वाढते. एकमेकांच्या साह्याने शिकले जाते.
- भाषिक सर्जनशीलता वाढते.

या सर्व वैचारिक पार्श्वभूमीवर निजभाषकांना आणि परभाषकांना मराठी शिकवण्यासाठी भाषिक खेळांचा वापर करण्याचा प्रयत्न आमच्यासारखे अनेक शिक्षक करत असतात. मग दिलेल्या शब्दांपासून कविता / चारोळी रचणे असो, किंवा शिकवलेल्या पाठातील शब्दांचा पाठापुरता शब्दकोश तयार करणे असो, एखाद्या शब्दाचे शब्दक्षेत्र तयार करणे असो, किंवा शब्दक्षेत्रातले शब्द सांगून मूळ शब्द ओळखायला लावणे असो, असे विविध नावीन्यपूर्ण भाषिक खेळ रचून भाषाध्यापन अधिकाधिक रंजक आणि प्रभावी कसे करता येईल याचा विचार करत असतात. अशाच प्रयत्नांतून जन्मलेला एक भाषिक खेळ म्हणजे मराठी शब्द-हौशी.

**मराठी शब्द-हौशी :**

नंबर हौजी हा सहली, कौटुंबिक समारंभ, कार्यालयीन कार्यक्रम असा कुठेही खेळता येणारा प्रसिद्ध आणि लोकप्रिय खेळ आहे. यात प्रत्येक सहभागी खेळाडूला एक तिकीट दिले जाते. त्या प्रत्येक तिकिटावर १ पासून ९९ पर्यंतचे कोणतेही नऊ आकडे असतात. शिवाय खेळाच्या सूत्रधाराकडे १ ते ९९ आकडे असलेली नाणी / बिल्ले असतात. सूत्रधार कोणत्याही क्रमाने एकेक नाणे / बिल्ला उचलून त्यावरचा आकडा पुकारत जातो आणि त्यांपैकी आपल्या तिकिटावर येणारे आकडे खेळाडू खोडत जातात. ज्याचे सगळे आकडे आधी खोडले जातात तो जिंकतो. असा हा हौजीचा खेळ.

हा खेळ मराठी शब्द वा अक्षरे घेऊन खेळता यायला हवा, असे माझे दिवंगत वडील विजय देशपांडे यांना अनेक वर्षांपासून वाटत होते. मराठी भाषेवरील प्रेम आणि प्रयोगशील स्वभावामुळे त्यांनी मराठी हौजी तयार करण्याचा चंग बांधला. त्यासाठी शेकडो कोडी पाहिली, ओळखीचे-अनोळखी शब्द शोधले, शब्दकोशांच्या आधारे शब्दांच्या याद्या तयार केल्या. खेळायच्या पत्त्यांचा जुना संच मुळाक्षरांसाठी वापरला. कागदांवर मुळाक्षरे लिहून ती पत्त्यांवर चिकटवली. एका तिकिटावर चार अक्षरांचा एक व पाच अक्षरांचा एक असे दोन शब्द घ्यायचे ठरवले. या शब्दांमध्ये जोडाक्षरे शक्यतो येऊ नयेत, तसेच ते एकापेक्षा जास्त तिकिटांवर येऊ नयेत, अशा काही अटी खेळाच्या सोयीसाठी ठेवल्यामुळे तो पूर्णत्वाला नेणे मात्र जिकिरीचे होत होते. जवळपास तीन वर्षांहून अधिक काळ ते या शब्दांच्या हौजीच्या मागे लागले होते. कच्च्या स्वरूपात तयार केलेल्या या खेळाचे आम्ही घरगुती समारंभांमध्ये,सहलींमध्ये प्रयोग केले. लोकांना तो अतिशय आवडलाही. मग नुसता खेळ नको,याचा आणखी काय उपयोग होऊ शकतो, याचाही

आम्ही विचार करू लागलो. मुंबईच्या राज्य मराठी विकास संस्थेचे प्रभारी संचालक डॉ. आनन्द काटीकर यांच्याबरोबर याबद्दल बोलणेही झाले होते, मात्र त्याला निश्चित काही आकार येत नव्हता. माझ्या वडलांचे २०१७च्या जानेवारीत निधन झाले. त्याच सुमारास भिलार येथील पुस्तकांच्या गावाची संकल्पना प्रत्यक्षात येऊ लागली होती. तेव्हा हा खेळ विकसित करून पुस्तकांच्या गावात ठेवण्याचे ठरवले आणि मराठी शब्द-हौशी या नावाने हा खेळ आकारास आला.

नुसताच शब्दांचा खेळ नको, त्यातून आणखी काही मिळायला हवे म्हणून या खेळात जे पत्ते वापरले जातात,त्यात प्रयोग करायचे ठरले. यात ५४ पत्ते आहेत, प्रत्येक पत्त्यावर मराठीतील एका प्रसिद्ध साहित्यिकाचं प्रचित्र आहे, त्याच्या जन्म व मृत्यू दिनांकासहित. मागील बाजूस त्या साहित्यिकाची माहिती आहे व एक मुळाक्षर आहे. (अ ते औ हे १४ स्वर, अं, अः हे स्वरादी, क ते ळ ही ३४ व्यंजने, आणि क्ष, ज्ञ ही विशेष अक्षरे) सोबत १९२ तिकिटे आहेत, प्रत्येक तिकिटावर एक चार अक्षरी आणि एक पाच अक्षरी असे दोन शब्द, म्हणजेच ३८४ शब्द आहेत.

या खेळाचे २ भाग आहेत :- १. साहित्य-शोध, २. शब्द-शोध

**शब्द-शोध खेळताना.....**

- खेळातील सहभागींना शब्दांच्या जोड्या असलेल्या चिठ्ठ्या वाटाव्यात.
- सूत्रधाराने त्याच्याजवळील पत्त्यांमधून एक पत्ता उघडून त्यावरील अक्षर पुकारावे.
- अक्षर पुकारले जाताच खेळाडूंनी आपल्या चिठ्ठीवरील शब्दांमधले ते अक्षर किंवा त्याचे कोणतेही रूप खोडावे. उदा.' क' हे अक्षर पुकारले गेल्यास 'क' च्या बाराखडीतील कोणतेही रूप खोडावे.
- पुकारले गेलेले अक्षर शब्दात जोडाक्षराच्या रूपात आल्यास तेवढेच अक्षर खोडावे. उदा. 'ष' हे अक्षर पुकारले गेल्यावर 'अष्टपैलू' या शब्दातील अर्धा 'ष' खोडावा, 'ट' तसाच ठेवावा. आणि 'ट' पुकारला गेल्यास 'ट' खोडून अर्धा 'ष' तसाच ठेवावा.
- ज्या खेळाडूचा चार अक्षरी/पाच अक्षरी शब्द प्रथम खोडला जाईल, तो त्या शब्दसंख्येसाठी विजयी ठरेल.
- याप्रमाणे ज्याच्या चिठ्ठीवरील दोन्ही शब्द सर्वप्रथम खोडले जातील, तो अंतिम विजयी ठरेल.
- खेळ संपल्यावर चिठ्ठ्यांवरील शब्दांचे अर्थ कोशात पाहून लिहून काढायला सांगावे.
- चिठ्ठ्यांवर काही गाजलेल्या साहित्यकृतींची नावेही आहेत. या साहित्यकृतींची नावे ऐकून त्यांचे लेखक, पात्रे, कथानक, वैशिष्ट्ये सांगणे असेही करता येईल.

**साहित्य-शोध खेळताना....**

१. खेळताना पत्ते पिसून एक पान काढावे.
२. मुखपृष्ठावरील लिखित मजकूर झाकून ठेवून, केवळ प्रचित्र दाखवून खेळणे सुरू करावे.
३. सर्वप्रथम साहित्यिकाचे नाव सांगणे.
४. त्यांच्या प्रसिद्ध साहित्यकृतींची नावे सांगणे.
५. कवी असल्यास प्रसिद्ध कवितांची अवतरणे सांगणे.

या खेळातून मनोरंजन तर होतेच, पण मराठी साहित्याविषयीही थोडी माहिती खेळणाऱ्यांच्या कानावर पडते. खेरीज, शाळा-महाविद्यालयांमध्ये खेळताना शिक्षक याचा आणखी अनेक पद्धतींनी उपयोग करून घेऊ शकतात. हा खेळ बेळगावातील कारदगा येथील शाळेत घेतला तेव्हा प्रत्येक विद्यार्थ्याला त्याच्या तिकिटावरील शब्दांचा वाक्यात उपयोग करून पाहायला सांगितले होते. शिवाय त्या शब्दांशी यमकानुसारी शब्द योजून एखादी अर्थपूर्ण चारोळी रचता येते का तेही पाहता येते.

दि. ४ मे २०१७ रोजी पुस्तकांच्या गावाचे लोकार्पण झाले आणि या निमित्ताने भिलारमध्ये मराठी शब्द-हौशीचे रीतसर प्रकाशन झाले. तेव्हापासून हजारो लोकांनी या गावाला भेट दिली आणि त्यांची या खेळाशीही ओळख झाली. लोकांचा उत्तम प्रतिसाद मिळाल्याने शब्दहौशीची पहिली आवृत्ती लगेचच संपली आणि लवकरच नवीन सुधारित आवृत्ती लोकांसमोर येईल. यासाठी राज्य मराठी विकास संस्थेतील श्री. सुशान्त देवळेकर यांचे मोलाचे मार्गदर्शन लाभले आहे.

हा खेळ खेळण्यासाठी वयाचे बंधन नाहीच. नाहीतरी एक ते १०० आकडे अगदी बाळबोध असूनही आपण सगळे हौजी आनंदाने खेळतोच ना! या खेळाच्या निमित्ताने काही जणांना मराठी साहित्यिकांची ओळख होईल, तर काही जणांची उजळणी नक्कीच होईल.

एका चिनी म्हणीचा अर्थ असा – “तुम्ही मला सांगितलंत तर मी ऐकेन... तुम्ही मला दाखवलंत तर मी पाहीन... पण तुम्ही मला करायला लावलंत तर मला ते समजेल.” म्हणून भाषाध्यापन प्रभावी करण्यासाठी खेळाचे तंत्र वापरले तर नुसते सांगणे-ऐकणे, दाखवणे-पाहणे यांपेक्षा प्रत्यक्ष करायला लावणे आणि त्यातून समजणे घडू शकेल आणि ते पारंपरिक पद्धतीपेक्षा खात्रीने अधिक प्रभावी असेल.

**केशवसुतांची कविता वाचून...**

शिवरायाच्या मागें आम्ही लालमहालीं फिरणें, तसेंच तुमच्या मागें आम्ही नवीन कविता करणें;
असेंच कांही कांही करुनी जीवित त्याला गणणें -'गोविंदाग्रज' म्हणे असे हे आम्हां लाजिरवाणें.





अनुक्रमणिका

दि. २७ फेब्रुवारी, २०१८.

**डॉ. अशोक केळकर पुरस्कार मिळाल्याबद्दल अविनाश बिनीवाले यांना देण्यात आलेले सन्मानपत्र**

अनघा मांडवकर

भाषाव्यवहार, साहित्य-समीक्षा, विविध ललितकला, सौंदर्यशास्त्र, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, शिक्षणपद्धती इत्यादी विद्याशाखांसंबंधीचे मराठी, इंग्रजी आणि हिंदी ह्या भाषांतील व्यासंगयुक्त लेखन, 'मराठी-अभ्यास-परिषदे'ची पायाभरणी, भारतीय विद्याक्षेत्रात भाषाविज्ञानाची केलेली 'रुजुवात', अशा विविधांगी योगदानातून अभ्यास-अध्यापन-संशोधनाच्या क्षेत्रात मानदंड बनलेले आंतरराष्ट्रीय कीर्तीचे दिवंगत भाषावैज्ञानिक अशोक रा. केळकर ह्यांच्या नावे महाराष्ट्र शासनाने सुरू केलेला 'मराठी-भाषा-अभ्यासक पुरस्कार' अध्यापन, लेखन आणि भाषान्तर ह्या माध्यमांतून मराठी व अन्य भारतीय भाषा तसेच परदेशी भाषा ह्यांत पाच दशकांहून अधिक काळ व्रतस्थपणे नि सातत्याने सेतुबान्धणीचे काम करीत आलेल्या आपल्यासारख्या ज्येष्ठ बहुभाषाविद भाषा-अभ्यासकास प्रदान करताना अत्यन्त आनन्द होतो आहे.

पुण्यातील फर्ग्युसन ह्या प्रतिष्ठित महाविद्यालयातून 'जर्मन आणि संस्कृत' ह्या विषयांतील पदवी-शिक्षण पूर्ण केल्यानंतर, आपण मुंबई विद्यापीठाच्या परदेशी-भाषा-विभागातून 'जर्मन आणि भाषाविज्ञान' ह्या विषयांचे पदव्युत्तर शिक्षण घेतले. पुढील काळात हैदराबादच्या सेन्ट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इन्डियन अँड फॉरेन लँग्वेजेस ह्या संस्थेतून आपण 'परदेशी भाषा म्हणून जर्मनचे अध्यापन' ह्या विषयात पदविका प्राप्त केली. मुंबईतील एल्फिन्स्टन महाविद्यालयाच्या जर्मन विभागातील प्राध्यापक आणि विभागप्रमुख ह्या पदावर आपण कार्यरत होता. ह्या पदावरून आपण सेवानिवृत्त झालात; तरी १९६३मध्ये, वयाच्या विशीत असताना, आपण हाती घेतलेले जर्मन भाषा-साहित्याच्या अध्यापनाचे कार्य आज सत्तरी ओलांडल्यावरही आपण तितक्याच उत्साहाने, तळमळीने करीत आहात. 'भूगोल' ह्या विषयासंबंधीच्या प्रेमातून आपण अनेक वर्षे पदवी स्तरापर्यंतच्या विद्यार्थ्यांना भूगोलाचेही अध्यापन केले. उद्योगक्षेत्रात भाषांतरकार-दुभाषी म्हणून काही काळ केलेले काम, तसेच १९६७ साली महाराष्ट्र-लोकसेवा-आयोगाच्या परीक्षेद्वारे महाराष्ट्र शासनाच्या शिक्षणसेवेत राजपत्रित अधिकारी म्हणून झालेली आपली निवड, भाषान्तरकार म्हणून शासकीय आणि शासनेतर संस्थांसाठी विविध प्रकारच्या शेकडो ग्रन्थांची, कागदपत्रांची केलेली भाषान्तरे हेही आपल्या यशस्वी कारकिर्दीतील महत्त्वाचे टप्पे होत.

परंतु आपल्या कारकिर्दीचा सर्वांत लक्षवेधी विशेष आहे – 'चतकोराने मला न सूख, कूपांतिल मी नच मंडूक' ह्या वृत्तीने आपण मराठीसोबत हिन्दी, संस्कृत, गुजराती इत्यादी भारतीय भाषांत आणि इंग्लिश, जर्मन, रूसी (रशियन), फ्रेंच ह्या परदेशी भाषांत प्राप्त केलेले प्रभुत्व; आणि 'वसुधैव कुटुम्बकम्' ह्या धारणेने विभिन्न भाषा, त्यांची व्याकरणे, शब्दसंग्रह, साहित्यपरंपरा, समाज -संस्कृती ह्यांत अनेकपदरी संवादसेतू साकारण्यासाठी अविरतपणे आणि आस्थेने घेतलेले परिश्रम.





अनुक्रमणिका

आपण कोल्हापूर विद्यापीठात रूसी भाषेचे, मणिपूर आणि काश्मीर विद्यापीठांत जर्मनचे अध्यापन केले, तसेच जर्मनीतील ग्योटिंगन विद्यापीठात अभ्यागत प्राध्यापक म्हणून काही काळ काम केले; तर दुसरीकडे आपण मुंबई विद्यापीठात अन्यभाषकांना मराठी शिकविले; परदेशांतील, विशेषतः फ्रेंचभाषक आणि जर्मनभाषक विद्यार्थ्यांना, अभ्यासकांना हिन्दी शिकविले; पूर्वांचलातील शिक्षकांसाठी हिन्दीचे, इंग्लिशचे वर्ग चालविले; इतकेच नव्हे, तर लिपिविषयक अभ्यासाच्या आवडीतून, कन्नड आणि तमिळ लिपी शिकण्यासाठी एकदिवसीय अभ्यासक्रम चालविले. भाषाध्यापन हा आपल्यासाठी केवळ व्यवसाय न उरता, स्वानन्दाने चोखाळलेला जीवनमार्ग बनत गेलेला दिसतो.

भाषाध्यापकाच्या जोडीने मराठी, हिन्दी, इंग्लिश आणि जर्मन ह्या भाषांतील लेखक आणि अनुवादक म्हणून आपले मराठी भाषा-साहित्य-परम्परेत अत्यन्त मोलाचे योगदान राहिले आहे. आपल्या सुमारे सत्तरेक ग्रन्थांत आपला भाषांचा व्यासङ्ग, प्रवासाचा छन्द, संस्कृतींचा अभ्यास आणि आपली सदाबहार, खुमासदार अभिव्यक्ती ह्यांचा सहजप्रत्यय येतो. 'गरुडांच्या देशात'सारखी प्रवासवर्णने, 'जय कैलाश ! जय मानस !', 'बोमदिला' ह्यांसारख्या कादम्बऱ्या, 'पूर्वांचल'सारखे सामाजिक-राजकीय-सांस्कृतिक वास्तव टिपणारे ग्रन्थ, विभिन्न प्रदेशांतील आहारसंस्कृतीची ओळख करून देणारा 'महाराष्ट्राबाहेरची न्याहारी (आणि बरंच काही)' ह्यासारखा लेखसङ्ग्रह, अशा आपल्या पुस्तकांतून भ्रमन्ती, गिर्यारोहण ह्यांविषयीच्या आवडीतून आपण मिळविलेले अनुभवसञ्चित वैशिष्ट्यपूर्ण रीतीने प्रकट झाले आहे. स्वतन्त्र लेखनाइतकेच आपले अनुवादकार्यही मौलिक आहे. बर्टोल्ट ब्रेश्ट, फ्रीडरिश वोल्फ ह्या जर्मन तसेच दस्तयेव्स्कि ह्या रशियन लेखकांच्या अभिजात साहित्यकृती मराठीत अनुवादित करण्याबरोबरच, आपण मराठीतील 'मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे' ह्या महत्त्वाच्या आत्मकथनाचा हिन्दीत अनुवाद केला आहे.

'भाषा' हे आपले मुख्य जीवनसूत्र असल्यामुळेच की काय, आपल्या अभिव्यक्तीचेही ते मुख्य विषयसूत्र बनलेले दिसते. 'परदेशी भाषांच्या अभ्यासासाठी इंग्लिशशिवाय पर्याय नाही, मराठीतून ह्या साऱ्या गोष्टी शक्य नाहीत,' ह्या गैरसमजांचा वेळोवेळी निरास करीत; 'भाकरीची भाषा' ठरणाऱ्या परदेशी भाषा मायमराठीच्या माध्यमातून शिकण्या-शिकविण्याची आग्रही भूमिका आपण मांडलेली आणि स्वतः अनुसरलेली दिसते. परदेशी भाषा शिकून अनेकांनी व्यक्तिगत प्रगती साधली; आपले वैशिष्ट्य हे की, आपण आपल्याकडील माहितीसञ्चिताचा 'भाकरीची भाषा' ह्या पुस्तकाच्या माध्यमातून परदेशी भाषांच्या शिक्षणासन्दर्भात मार्गदर्शन हवे असलेल्या हजारो मराठी तरुणांना लाभ करून दिला. आपण जर्मन, फ्रेंच ह्या भाषांच्या स्वयं-अध्ययनाकरिता मराठीत व अन्य काही भारतीय भाषांत उपलब्ध करून दिलेली 'जर्मन शिकू या', 'फ्रान्सिसी भाषा का श्रीगणेश' इत्यादी मार्गदर्शक पुस्तके; जर्मन, मराठी, इंग्लिश, हिन्दी, सिन्धी ह्या भाषांच्या अध्ययनाकरिता आवश्यक अशा द्वैभाषिक, त्रैभाषिक कोशांची केलेली निर्मिती; व्याकरणविषयक भीती, गैरसमज दूर करून त्यासम्बन्धीची मर्मदृष्टी देणाऱ्या 'नावडतं व्याकरण होईल आवडतं

व्याकरण', 'सोपे व्याकरण' अशा पुस्तकांचे केलेले लेखन; शब्दांचा इतिहास, त्यांच्या व्युत्पत्ती ह्यांविषयीच्या रञ्जक कथा मांडणारे 'शब्दगन्ध', 'परिसस्पर्श'सारखे लेखसङ्ग्रह; भाषा व प्रदेश, समाज-संस्कृती ह्यांतील अनुबन्ध शोधणारे 'ओऽडर ते राईन', 'भाषा घडताना' सारखे ग्रन्थ; समाजभाषावैज्ञानिक दृष्टीने केलेले 'भाषाकारण', 'बोलु कवतिके' सारखे अभ्यासपूर्ण लेखन, ह्या आपल्या अफाट लेखनप्रपञ्चातून आपण मराठीतील भाषाभ्यासविषयक साहित्याचे दालन सर्वार्थाने समृद्ध केले आहे. 'भाषा आपली सर्वांचीच', 'माय मरो पण' ह्यांसारख्या ग्रन्थांतील लेखांतून भारतीय भाषांच्या सद्यःस्थितीविषयी, विशेषतः मराठीच्या स्थितिगतीविषयी आपण तळमळीने मांडलेले दिशादर्शक विचार, आपल्या अनेक पुस्तकांत भेटणारी, आपल्या समाजातील वासाहतिक न्यूनगंडावर कोरडे ओढणारी 'न्यू इम्ब्री देशाची कहाणी', आपल्या पुस्तकांच्या मुद्रणातून आपण कटाक्षाने जपलेली भारतीय भाषांतील पर-सवर्ण-लेखनाची परम्परा, ह्या साऱ्यांतून आपले भाषेवर केवळ प्रेम नसून, भाषा हा आपला जीव, आपला श्वास, आपला निदिध्यास आहे, हे जाणवते.

मराठीसोबत हिन्दी, संस्कृत ,गुजराती, असमिया, कन्नड, इंग्लिश ह्या भाषांमध्येही आपले विपुल लेखन प्रकाशित झाले असून; त्यांत '(अ)घोरकष्टोद्धारणस्तोत्रा'पासून 'रजोनिवृत्ती'पर्यंतचे, भारताच्या माजी पन्तप्रधानांच्या चरित्रापासून ते भारत-चीन-युद्धापर्यंतचे विस्मित करणारे विषयवैविध्य आढळून येते. आपणांस अनेक पुरस्कारांनी, सन्मानांनी गौरविण्यात आले आहे. २००१ साली 'भाषा आपली सर्वांचीच' ह्या आपल्या ग्रन्थास कोकण-मराठी-साहित्य-परिषदेचा पुरस्कार लाभला. २०१४ मध्ये 'जय कैलाश' ह्या आपल्या हिन्दी कादम्बरीस हिन्दी साहित्य अकादमीच्या पुरस्काराने गौरविण्यात आले.

ग्रन्थांव्यतिरिक्त मराठीतील जवळपास सर्व महत्त्वाच्या वृत्तपत्रांसाठी लिहिलेली सदरे; दूरदर्शनसाठी केलेले 'सांगा, उत्तर सांगा', 'आमची शाखा कुठेही नाही' ह्या कार्यक्रमांचे लेखन; स्वदेशात आणि विदेशात युवा पिढीसाठी दिलेली असङ्ख्य व्याख्याने, अशा विविध माध्यमांतून आपण 'शहाणे करूनि सोडावे सकळजन'चा चालविलेला प्रयास एखाद्या वस्तुपाठासारखा आहे. ह्या प्रयासाचा सङ्ख्यात्मक आणि गुणात्मक आवाका थक्क करणारा, 'महाराष्ट्रातील कर्मयोगी व्यक्ती ह्या एकेका संस्थेच्या तोलाच्या असतात !' ह्या विधानाची आठवण करून देणारा आहे. 'बेबेलची मिथ्यकथा' असे सांगते की, माणसांचा स्वर्गात पोहोचण्याचा प्रयत्न विफल व्हावा, म्हणून देवांच्या राजाने स्वर्गापर्यंतचा मनोरा बांधत असलेल्या प्रत्येक माणसाची भाषा विलग केली आणि तेव्हापासून माणसेही विलग झाली. पण आपल्यासारखे बहुभाषाविद अभ्यासक ह्या भाषाभाषांत, पर्यायाने मानवसमूहांत निर्माण करीत असलेले संवादद्रुवे हे एकात्म मानवी संवादविश्वाच्या खऱ्या स्वर्गाकडे नेणाऱ्या मनोऱ्याचा पुन्हा जोमाने पाया रचत आहेत. आपल्या ह्या महनीय कार्यास 'अशोक केळकर मराठी-भाषा-अभ्यासक पुरस्कारा'च्या रूपाने आमचे विनम्र अभिवादन! ह्यापुढेही आपल्या अभ्यासातून, संशोधन-लेखनातून मायमराठी आणि अन्य भाषा ह्यांतील संवादसेतू सुदृढ, संवर्धित होत राहील. आपल्या भविष्यातील वाटचालीकरिता मनःपूर्वक शुभेच्छा !

# सट्टा-मटका बाजाराची भाषा

निधी पटवर्धन

साधारण बसस्थानकावर वर्तमानपत्र व पुस्तकविक्रेत्यांकडे गुलाबी-पिवळे कागद व त्यावर काही आकडे पाहून 'हे काय आहे?' हे असं एका स्त्रीने विचारल्यावर ज्या पद्धतीने पुस्तक विक्रेते किंचित लज्जापूर्ण हास्य करतात तिथे माझी उत्सुकता चाळवली. ते कागद 'आकडा लावतात त्यासाठी आहेत' असे पुस्तकविक्रेत्याने सांगितले. त्याला *'पॅनल चार्ट'* म्हणतात हे नंतर समजले. बेलिलियस रोड, हावडा ७११ १०१ प. बंगाल या पत्त्यावरून मटकेबाजाराची पुस्तके येतात. त्यात पूर्ण वर्षाचे तक्ते उपलब्ध असतात. हा खेळ कसा खेळायचा याचीही पुस्तके असत पण पोलिसांच्या धाकाने अनेकांनी ती जाळून टाकली असल्याने पहावयास उपलब्ध झाली नाहीत. हा बाजार सुरु कसा झाला याची रत्नागिरी परिसरात फिरून माहिती घ्यायला सुरुवात केली. https:/sattamatkai.net ही वेबसाईट पहिली. आणि त्यातील खास भाषेचा परिचय झाला तो असा...

पहिल्यांदा कॉटन बाजार असायचा. कापसाचे दर फुटायचे. त्या दरानुसार *'फिगर'/'आकडा'* ओपन व्हायचा. नंतर पत्त्यावरून हा बाजार सुरू झाला. भारतात मटका स्वातंत्र्यपूर्व काळापासून आहे असे जुने जाणते लोक सांगतात. मडक्याच्या आत चिठ्ठ्या टाकून टाकून त्यातून नंबर काढत असत. मटक्याचा प्रयोग होई म्हणून मटका असे या खेळाचे नाव पडले. डे मधुर, नाईट मधुर, डे मिलन, वरळी बाजार, टाईम बाजार, बालाजी किंग डे, तारा मुंबई डे, राजधानी डे असे दिवस-रात्र मटका बाजार उपलब्ध आहेत. विशेषतः कल्याण व मुंबई बाजारात जे खास शब्द मिळाले त्याची माहिती अशी. ५२ पत्त्यातले १२ रंगीत पत्ते (राजा, राणी, गुलाम) बाजूला काढले जातात. त्याला '*भावली बाजूला काढणे*' म्हणतात. मटकेबाजारातील पत्ते पुढील विशेषनावांनी नावाने ओळखले जातात. एक्का – एक्का, दुरी – *दुवा,* तिरी-*तिया,* चौका – *चॉकलेट,* पंजा – *काँग्रेस,* छक्का – *छगन,* सत्ता – *लंगडा,* अठ्ठ्या- अठ्ठ्या, नव्वा – *नयला,* दश्शा – *मेंढी/जिलबी.* यातील तीन पत्ते उघडले जातात. ते कसेही आले तरी १ २ ३ अशा चढत्या क्रमानेच ते लावून घेतले जातात. उदा. ९ ३ ६ असे पत्ते आले तरी ३ ६ ९ असेच लावून घेतले जातात. हा खेळ दोनदा खेळला जातो. त्याला '*ओपन व क्लोज ची खबर आली* ' असे म्हणतात. ओपनची खबर संध्याकाळी ४.१२ ला फुटते आणि ४.१५ पर्यंत जगात पोहचते. उदा. ३ ६ ८ यांची बेरीज करायची ३+६+८ =१७ तर शेवटचा आकडा ७ म्हणजे सत्ता/लंगडा आला. क्लोजची खबर संध्याकाळी ६.१२ ला फुटते आणि ६.१५ पर्यंत येते. उदा. १ २ ३ = ६ क्लोजचा छक्का आला. ज्याला ओपन लागला त्याला १ रुपयाला ९ असे नऊपट रुपये मिळतात. ३ ६ ८ असे सगळे आकडे लावायचे असतील तर त्याला *'पाना लावा'* असे सांगतात. ओपन व क्लोज चा पाना लागला तर त्याला *'जॅकपॉट लागला'* म्हणतात. जॅकपॉटला १ रुपयाला ८००० ते १०००० पर्यंत पैसे मिळतात. ३ ६ ८ ला तीनशे अडुसष्ट न म्हणता तीन सहा आठ असेच म्हटले

जाते. *'गुणिले पाना'* ही अजून एक संकल्पना आहे. ओपन व क्लोजच्या आकड्यांची बेरीज काय येईल हे वर्तवायचे असते. उदा. ओपन ला ३ ६ ८ = १७ म्हणजे ओपनला ७ आला. आणि क्लोजला १ २ ३ = ०६ म्हणजे ६ आला तर ७६ चं *'ब्रॅकेट'* झालं म्हणतात. जर आकडा लावणाऱ्याने ७६ चा गुणिले पाना लावला तर ७६ चं ब्रॅकेट होऊन त्याचा *'गुणिले पाना पास झाला'* म्हणतात. ०० ते ९९ पर्यंत ब्रॅकेट लावू शकतो. ०० ला *'डबलमेंढी'* म्हणतात. जर डबल आकडा लागला तर त्यालाच *'गेम झाली/आली'* म्हणतात. एखादा आकडा चार दिवसांनी असा येईल हा अंदाज वर्तवला जातो त्याला *'टर्न'* म्हणतात.

***सिंगल पाना*** **-** आकड्याची पाने समान नसली तर *'सिंगल पाना'* असे म्हणतात. उदा. उदा. १४५, २८९, २४६

***डबल पाना*** **-** आकड्याची दोन पाने समान लावली तर 'डबल पाना' घ्या असे म्हणतात. उदा. २३३, ८८५, ६७७, २९९

***राउंड पाना*** **-** आकड्याची पाने क्रमाने लावली उदा. १२३, ७८९, ३४५ तर 'राउंड पाना' खेळला असे म्हणतात. अकोला भागात यालाच 'उतार' असेही म्हणतात.

***ट्रिपल पाना/संगम पाना*** **-** आकड्याची तिन्ही पाने समान लावली तर 'ट्रिपल पाना' घ्या असे म्हणतात. उदा. ३३३, ५५५

***सायकल/मोटार पाना*** **-** पाच आकडे लावले जातात. त्याचे दहा सिंगल पाने तयार होतात. उदा. १२३४५ लावले तर १२३, १२४, १२५, १३४, १३५, १४५, २३४, २३५, २४५, ३४५ हे दहा पाने तयार होतात. या पान्यातली कोणतीही एक जोडी लागली तरी त्याचा पाना पास झाला म्हणतात. हे पाने *एकीत* १३५७९ वा *बेकीत* २४६८० लावा असेही म्हणतात. अधिक माहिती MAIN MUMBAI cycle pana today या नावाने 'यू ट्यूब'वर पाहू शकता. प्रत्यक्षात तो कसा काढतात याचा डेमोही पाहायला मिळेल.

***गेम व कट गेम*** **-** याचे असे जोड तयार होतात. उदा. ११, २२, ३३, ४४, ५५, ६६, ७७, ८८, ९९, ०० असा जोड आला तर गेम झाली असे म्हणतात. तर

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| *कट* – | १ X ६ | १६ | ६१ | २ X ७ | २७ | ७२ |
| | ३ X ८ | ३८ | ८३ | ४ X ९ | ४९ | ९४ |
| | ५ X ० | ५० | ०० | | | |

असे आकडे आले तर *'कंट गेम'* झाली असे म्हणतात.

***साधाजोड*** **-** याचे आठ जोड तयार होतात.

उदा. १२-१७, ६२-६७, २१-२६, ७१-७६ किंवा उलट

२३-२८, ७३-७८, ३२-३७, ८२-८७

***लडी लागणे*** - हा प्रकार रत्नागिरी परिसरात नाही. नागपूर, अकोला परिसरात आहे. पहिला बाजार कल्याणचे ओपन क्लोज चे ७ ६ आणि नंतर उघडणारा मुंबई बाजाराचे ओपन क्लोजचे ४ ३ असे आकडे लावले आणि तसेच ७ ६ ४ ३ आकडे लागले तर 'लडी लागली' असे म्हणतात. ही



अनुक्रमणिका

लडी मिलन डे, मिलन नाईट या बाजारालाही लावू शकतात. आधी व नंतर उघडणारे कोणतेही दोन बाजार घेऊन ही लडी लावता येते. २५ पैशाला १०० रुपये मिळतात.

***लेवल काढणे*** – धंदा करणारा नफा तोटे किती होईल याचा अंदाज घेतो त्याला *'लेवल काढणे'* म्हणतात.

***खायला परवडणे*** – जितका धंदा परवडतो त्याला तेवढा करायचा आणि बाकी वरच्या माणसाकडे देऊन टाकायचा. तो जितका परवडतो त्याला 'खायला परवडणे' म्हणतात. जेवढा धंदा खायला परवडतो त्याला *'धंदा आत ठेवणे'* म्हणतात. जेवढा धंदा खायला परवडत नाही त्याला *'धंदा बाहेर काढणे'* म्हणतात.

***फुल भाव*** – आपण गिऱ्हाईकाला १ रुपयाला बाजारभाव ९ रुपये देतो. त्यातील वरचा एक रुपया न खाता पूर्ण (रुपयाला १० रुपये) पैसे देणे याला 'फुल भाव' म्हणतात.

सध्याचे बाजारभाव व फुल भाव पुढीलप्रमाणे आहेत. हे ठिकाणाप्रमाणे बदलतानाही दिसतात. रत्नागिरी मधील भाव असे -

| | **बाजारभाव** | **फुल भाव** |
|---|---|---|
| सिंगल : | १ रुपयाला ९ रुपये | १० रुपये |
| जोड : | १ रुपयाला ९० रुपये | १०० रुपये |
| सिंगलपाना: | १ रुपयाला १२० रुपये | १६५ रुपये |
| डबलपाना: | १ रुपयाला २०० रुपये | ३३० रुपये |
| ट्रिपलपाना: | १ रुपयाला ५०० रुपये | ८०० रुपये |
| गुणिले पाना: | १ रुपयाला ८०० रुपये | १००० रुपये |
| जॅकपॉट: | १ रुपयाला १०००० रुपये | १५००० रुपये |

ही रत्नागिरीच्या आसपास फिरून जमवलेली माहिती असल्याने 'खायला परवडणे' यासारखी वाक्यरचना खास कोकणातील आहे. यालाच अमरावती भागात 'खायवाळी' असे म्हणतात. परिसराप्रमाणे ही भाषा बदलतानाही दिसते. जसे अमरावती, अकोट भागात डबलपान्याला *'ज्यूट'* म्हणतात. ट्रिपल पान्याला *'परेल'* म्हणतात. टर्नला 'बोगी' म्हणतात.

वर्तमानपत्रातून हे आकडे 'शुभांक' म्हणून जाहीर होत. या धंद्यातून मिळणारे उत्पन्न शासनाच्या तिजोरीत जात नाही, म्हणून शासनाने स्वतःची अधिकृत लॉटरी तयार केली आहे. आता सामान्यलोकांच्या मटक्याची जागा उच्चभ्रूंच्या बेटिंगने घेतली आहे, इतकेच.

**निर्दयी बालेस** (अपूर्ण) मे, १९१६.

केल्या ज्याच्या पायघडया मीं तुझ्या पावलांसाठी॥
त्या हृदयाला तुडवुनि गेलिस नटव्या थाटापाठी !॥६॥

होइल होइल वाटत होतें तेंच अखेरिस झालें ॥
नांव घेतल्यावांचुन आता मनांत झुरणें आलें ॥११॥

## लेखक परिचय

- **आनन्द काटीकर** : फर्ग्युसन महाविद्यालयात मराठी विषयाचे सहयोगी प्राध्यापक, मराठी अध्यापनाचा १९ वर्षे अनुभव, 'भाषा आणि जीवन'च्या संपादक मंडळाचे सदस्य, ऑगस्ट २०१५ पासून राज्य मराठी विकास संस्थेचे प्रभारी संचालक

  चलभाष ९४२१६ १०७०४; ई-पत्ता : anand.katikar.marathi@gmail.com

- **भाऊ तोरसेकर** : सुप्रसिद्ध पत्रकार, जागता पहारा, हम लोग (We The People), पंचनामा, उलटतपासणी इ.अनुदिनीचे नियमित लेखक, राजकीय पत्रकारितेबरोबरच अन्य विषयांवरही अभ्यासपूर्ण लेखन; विविध विषयांवर पुस्तके प्रसिद्ध,

  चलभाष ९७०२१ ३४६२४; ई-पत्ता : bhaupunya@gmail.com

- **विनायक गंधे** : डी.बी. जे. महाविद्यालय, चिपळूण येथून मराठीचे प्राध्यापक म्हणून सेवानिवृत्त, मराठी भाषा आणि व्याकरण ह्यावर विशेष अभ्यास, ८ पुस्तके प्रसिद्ध

  पत्ता : सी-201 राधिका सहकारी गृहरचना पर्वतीनगर, सिंहगड रस्ता, पुणे ४११ ०३०.

  स्थिरभाष : ०२०-२४२५ १४७५ चलभाष : ९८५०६ ३८८२८

- **अरविंद जाधव** : एम. ए. व यूजीसी-नेट (इंग्रजी), एम. ए. व यूजीसी-नेट (भाषाविज्ञान); जर्मन भाषेतील पदविका. यशवंतराव चव्हाण शास्त्र महाविद्यालय, कराड येथे साहाय्यक प्राध्यापक पदावर कार्यरत. सध्या डेक्कन कॉलेज, पुणे येथे 'स्पेशिअल पोस्टपोजिशनस् इन मराठी: अ कॉग्निटिव्ह सिमँटिक अप्रोच' या विषयावर संशोधन सुरू आहे.

  चलभाषः ९८८१५ ०३०८७ ई-पत्ताः arvind.linguistics@gmail.com

- **सोनाली देशपांडे-गुजर** : ऐरोली येथील मेहता महाविद्यालयात २० वर्षे मराठीचे अध्यापन केले. सध्या मुंबई विद्यापीठ आणि राज्य मराठी विकास संस्था यांच्या संयुक्त मायमराठी प्रकल्पात अमराठी भाषकांना मराठी अध्यापनाची साधने तयार करण्यात आणि प्रत्यक्ष अध्यापनात सहभाग, मुक्त भाषासेवी म्हणून कार्यरत,

  चलभाष : ९८२१४ ११४६६ ई-पत्ता- sonaleegujar@gmail.com

- **निधी पटवर्धन** : गोगटे-जोगळेकर महाविद्यालय, रत्नागिरी येथे मराठीच्या प्राध्यापक, भाषा हा आवडीचा विषय, विविध भाषिक-सांस्कृतिक उपक्रमांत सक्रिय सहभाग,

  चलभाष : ९४२१४ ३९६६४, ई-पत्ता– nidheepatwardhan@gmail.com

श्री. निशिकांत मिरजकर

डॉ. आनन्द काटीकर



प्रा. प्र. ना. परांजपे

अपर्णा झा

भाषावार्ता : मराठी अभ्यास परिषदेतर्फे भाषेच्या अनुषंगाने प्रकाशित केल्या जाणाऱ्या मराठी ग्रंथांमधून दरवर्षी एका ग्रंथाची महाबँक पुरस्कारासाठी निवड केली जाते व एक विशेष कार्यक्रम आयोजित करून त्या ग्रंथाच्या कर्त्याचा गौरव केला जातो. २०१७ ह्या वर्षासाठी श्री. रमेश पानसे ह्यांनी लिहिलेल्या 'भाषाग्रहण व भाषाशिक्षण' ह्या ग्रंथाची मराठी अभ्यास परिषद भाषाविषयक लेखन पुरस्कारासाठी निवड करण्यात आली. हा पुरस्कार श्री. निशिकांत मिरजकर यांच्या हस्ते धन्वंतरी सभागृह, एरंडवणा, पुणे येथे दि. १२ जानेवारी, २०१८ रोजी श्री. रमेश पानसे यांना दिला गेला. अपर्णा झा, शुभांगी कर्डिले आणि सरोजा भाटे (निमंत्रक) यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले. प्रा. प्र. ना. परांजपे हे अध्यक्षस्थानी होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्यवाह आनन्द काटीकर यांनी केले.

अनुक्रमणिका

मंगल देशा ! पवित्र देशा ! महाराष्ट्र देशा ।
प्रणाम घ्यावा माझा हा, श्रीमहाराष्ट्र देशा ॥ धृ. ॥

राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा ।
नाजुक देशा, कोमल देशा, फुलांच्याहि देशा ।
अंजनकांचनकरवंदीच्या कांटेरी देशा ॥
भावभक्तिच्या देशा, आणिक बुध्दीच्या देशा ॥
शाहीरांच्या देशा, कर्त्या मर्दांच्या देशा, ॥
ध्येय जें तुझ्या अंतरी
निशाणावरी
नाचतें करीं ॥
जोडी इहपरलोकांसी
व्यवहारा परमार्थासी
वैभवासि वैराग्यासी ॥
जरिपटक्यासह भगव्या झेंडयाच्या एकचि देशा ॥
प्रणाम घ्यावा माझा हा, श्रीमहाराष्ट्र देशा ॥१॥

- गोविंदाग्रज


बुकपोस्ट-बुकपॅकेट-त्रैमासिक
BOOK PACKET Containing Periodical



प्रेषकः
प्रा० आनंद काटीकर
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद,
बी-५/१६, सनसिटी, सिंहगड रस्ता,
आनंदनगर, पुणे ४११ ०५१.
marathi.abhyas.parishad@gmail.com




मूल्य ₹ ४०/-


मराठी अभ्यास परिषद पत्रिका
भाषा आणि जीवन
वर्ष ३६। अंक १ । हिवाळा २०१८
R.N.I. नोंदणी क्रमांक : 40048/83
ISSN 2231 - 4059
Marathi Abhyas Parishad Patrika
UGC Approved No. 40699







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद